पुणे, किशोर–वर्ष ५२, अंक २ रा, फेब्रुवारी २०२३ (मासिक) – किंमत रु.७/– पृष्ठे–५२.
Pune, Kishor - Vol.52, Issue 2, February, 2023 ( Monthly ) - Rs. 7 /- Pages -52

# किशोर

फेब्रुवारी २०२३



डॉ.संजय लांडगे

# माय मराठी

माझा मराठी बाणा
आहे मर्दानी कणखर
ज्ञाना तुकोबाची वाणी
जनी झळाळे झणकर

माझा मराठी माणूस
आहे रांगडा फाकडा
त्याची कीर्ती अपरिमित
शूरमर्दानी तगडा

माझी मराठी माती
आहे काळी सावळीच
तिने जपल्या पिढ्या
सुखी सारी माऊलीच

माझ्या मराठी भाषेची
काय वर्णावी थोरवी
इथे नांदते सरस्वती
भाषा सखी गान गौरवी

माझ्या मराठीची अस्मिता
आहे जगी थोर
माझ्या मराठीची आस्था
देई सर्वांना आधार

माझ्या मराठी साहित्याचा
आहे बहर सुंदर
कला शिल्प क्रीडेचा
गौरव गाजतो चौफेर

माझी मराठी सृजन
आहे मधुर भजन
सत्य शांती अहिंसेचे
रोज घडते इथे दर्शन

संपर्क : ९८२२५४६०७४



फेब्रुवारी २०२३, वर्ष ५२ वे, अंक २ रा, माघ-फाल्गुन, शके १९४४

# किशोर

संपादक :
कृष्णकुमार पाटील, संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रकाशक :
विवेक उत्तम गोसावी
नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ, प्रभादेवी, मुंबई

निर्मिती अधिकारी :
हेमंत बाबर

अक्षरजुळणी : किशोर विभाग

कार्यकारी संपादक :
किरण केंद्रे

वितरण व्यवस्थापक :
जालिंदर पाटील

मुखपृष्ठ :
राजेंद्र गिरधारी

चित्रांकन :
श्रीनिवास प्रभुदेसाई, घनश्याम देशमुख, योगिता धोटे, माईंडईट संवाद, धनश्री केळकर, राजेंद्र गिरधारी, अंबिका करंदीकर, अजय विभुते, गणेश ढवळे, निकीता वैद्य, जैत्र डिजिटल, अमृता ढगे

## अंतरंग



ऑनलाईन वर्गणीकरिता : www.kishor.ebalbharati.in

वार्षिक वर्गणीची रक्कम रु.८०/- मनिऑर्डर अथवा कोणत्याही राष्ट्रीयीकृत बँकेच्या पुणे शाखेवरील डिमांड ड्राफ्टद्वारे संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ, या नावाने खाली नमूद केलेल्या पत्रव्यवहाराच्या पत्त्यावर पाठवावी. धनादेश स्वीकारला जाणार नाही.

**पत्रव्यवहाराचा पत्ता: कार्यकारी संपादक, किशोर, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,**
सेनापती बापट मार्ग, पुणे- ४११००४ संपादकीय : ०२०- २५७१६१०७ वितरण व तक्रार : ०२०-२५७१६२४४
ई-मेल : executive_editor_kishor@ebalbharati.in

# प्रिय किशोर

कथा, कविता वाचतो
शोधतो कुतूहलचे उत्तर
अभ्यासाच्या सोबतीला
किशोरचे अंक सुंदर




**किशोर मित्रपरिवार**
जिल्हा परिषद केंद्रीय प्राथमिक कन्याशाळा,
भोकर, जि. नांदेड

हितगुज

# छत्रपती शिवाजी महाराज : स्वराज्याचा दीपस्तंभ

छत्रपती शिवाजीमहाराज म्हणजे संबंध महाराष्ट्राचेच नाही तर अखिल भारतवर्षाचे प्रेरणास्थान आहेत. अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्याचा ध्यास घेतला आणि मोठ्या जिद्दीने, पराक्रमाने हिंदवी स्वराज्याची स्थापना केली. शिवछत्रपतींच्या आयुष्यातील महत्त्वाचे प्रसंग, त्यांची रणनीती, राजनीती, त्यांचे लोककल्याणकारी प्रशासन आजही आदर्शवत असेच आहे. समाजाच्या विविध थरांतील लोकांना एकत्र करून महाराजांनी बलाढ्य अशा शत्रूंशी यशस्वी लढा दिला. शौर्य, पराक्रम,धाडस, ध्येयवाद, कुशल संघटन, नियोजनबद्ध प्रशासन, मुत्सद्दीपणा आणि दूरदृष्टी या गुणांच्या बळावर स्वराज्याची मुहूर्तमेढ रोवली. जगातील निवडक सेनानायकांच्या रांगेत राजांचे स्थान अव्वल आहे. कारण शिवाजीमहाराज फक्त लढाई जिंकून थांबले नाहीत तर त्यांनी जिंकलेल्या प्रदेशाची नीट घडी बसवली. अष्टप्रधान मंडळ निर्माण केले. सामान्य लोकांमध्ये देशप्रेमाची भावना जागृत करतानाच आदर्श प्रशासन व न्यायव्यवस्था निर्माण केली. सह्याद्रीच्या कुशीत नवीन गडकिल्ले बांधले तसेच जुन्या किल्ल्यांची डागडुजी करून त्याचा स्वराज्याच्या रक्षणासाठी उपयोग करून घेतला. आपल्या अल्प कारकीर्दीत महाराजांनी लोककल्याणकारी राज्य स्थापन करून पुढील राज्यकर्त्यांना दिशा दाखवून दिली.

किशोर मित्रांनो, शिवरायांची संपूर्ण कारकीर्द आपल्यासाठी एखाद्या दीपस्तंभासारखी मार्गदर्शक आहे. छत्रपती शिवाजीमहाराज हे नाव उच्चारले तरी आपल्या हृदयाची स्पंदने आनंदाने आणि अभिमानाने धडधडू लागतात. त्यांच्या जीवनातील एकेक प्रसंग आपल्याला आजही नवी प्रेरणा देतो. मनामनात स्फुलिंग चेतवतो. लढण्याचं, जिंकण्याचं बळ देतो. शिवरायांचे उज्ज्वल आणि उदात्त चरित्र प्रत्येक पिढीसाठी महत्त्वाचा ठेवा आहे. तो जपून ठेवणे हे आपले कर्तव्य आहे. यासाठी शिवाजीमहाराज पुन:पुन्हा समजून घेणे आवश्यक आहे. एखादी व्यक्ती शेकडो वर्षे मनामनांवर राज्य का करते हे गुपित शोधायला हवे. शेकडो वर्षांच्या जुलमातून जनतेची सुटका करणारे, शत्रूंच्या स्त्रियांचा योग्य तो सन्मान राखणारे, रयतेच्या भाजीच्या देठालाही हात न लावण्याचा आदेश देणारे महाराज हे खऱ्या अर्थाने 'रयतेचे राजे' होते. दरवर्षी आपण मोठ्या उत्साहाने आणि अभिमानाने शिवजयंती साजरी करतो. या वर्षीची शिवजयंती साजरी करताना आपण शिवरायांचे प्रेरणादायी चरित्रही समजून घेऊया.

किरण केंद्रे
कार्यकारी संपादक

# जंगल जंगल बात चली है...

आसावरी चिपळूणकर



महाराष्ट्राच्या बाजूच्या सिल्लारी या गेटने आम्ही 'पेंच टायगर रिझर्व्ह'कडे जाऊ लागलो, तेव्हा संध्याकाळ उलटून गेली होती. श्रीनगर-कन्याकुमारी 'हाय वे'वरच्या एका छोट्याशा टपरीवर गरमागरम 'इलायची'वाला स्पेशल चाय पितानाच क्षितिजावर सूर्य मावळत होता. चहाच्या घुटक्यांबरोबर ती सोनेरी, गुलाबीलाल संध्याकाळ मोहरून टाकणारी होती. पेंचला जायचं असल्याने आम्ही मग सिल्लारी गेटकडे मार्गस्थ झालो.

महाराष्ट्राच्या बाजूने आत जाणाऱ्या सिल्लारी गेटकडून सहसा पेंचला जाणाऱ्यांची संख्या कमीच. बहुतेक जण मध्यप्रदेशातील गेटमधून आत जाण्यासाठी जिप्सीचं आणि कॉटेजचंही बुकिंग करतात; कारण तिथून 'टायगर सायटिंग' चांगलं आणि जास्त होतं म्हणे.

अगदीच खोटं नाहीच ते; पण म्हणून सिल्लारी गेटकडून जाण्याचा मार्ग दुर्लक्षित करण्याएवढाही वाईट नाही. किंबहुना ज्याला खरं जंगल अनुभवायचं आहे; ज्याला विविध वनस्पती, वृक्षं, झुडपं आणि गवताचा गंध श्वासात भरून घ्यायचा आहे आणि पक्ष्यांविषयी मनापासून तळमळ वाटते, अशांनी तर आवर्जून सिल्लारी गेटनेच 'पेंच'कडे निघावं. आम्ही नेमकं हेच केलं.

माझ्याबरोबर माझा सहा वर्षांचा मुलगा, अबीर होता. जंगलाची सवय करायची, तर मुलांना फक्त 'टायगर' हे आकर्षण दाखवण्यात अर्थ नाही. ते योग्यही नाही. त्यामुळे गंध, स्पर्श, नजरेने आणि कानांनीही अनुभवता येईल,

अशा पद्धतीनेच जंगल अनुभवलं जावं. मी तेच करायचं ठरवलं होतं. जेव्हा सिल्लारी गेटच्या दिशेने निघालो, तेव्हा संध्याकाळ उलटून गेल्यामुळे गारवा जाणवू लागला होता. दोनच दिवसांपूर्वी, नोव्हेंबर महिना असूनही,पश्चिम किनारपट्टी आणि पुणे या भागांत पाऊस पडून गेल्यामुळे नागपूरमध्ये वातावरण काहीसं दमट होतं. मात्र, तो चिकचिकाट सिल्लारी गेटच्या दिशेने गाडी वळताच थंड हवेत बदलला. इतका, की चक्क स्वेटर आणि कानटोपी घालावी लागली.

'अमलताश'च्या इको कॉटेजचं बुकिंग आधीच झालं असल्यामुळे तिथे कागदपत्रांची तपासणी झाल्यानंतर आम्ही थेट रूममध्येच गेलो. दुसऱ्या दिवशी अगदी सकाळी लवकर पहिली राइड होती. सकाळी सहा वाजता राइडला निघायचं, तर किमान पाऊण तास आधी उठून आवरणं आवश्यक होतं. जिप्सीचे ड्रायव्हर आणि सोबत येणाऱ्या गाईड यांच्यासाठीची फी प्रत्यक्ष जिप्सी जिथून निघतात, त्या काऊंटरवर 'कॅश पेमेंट'नेच करायची होती. त्यामुळे त्यात किती वेळ जाईल, हे माहीत नसल्यामुळे सोबत पक्षीनिरीक्षणासाठी दुर्बीण, पाण्याची बाटली, डब्यातून नेलेली आवाज न होणारी बिस्कीटं आणि सँडविच आम्ही सोबत घेतलं. जंगलात फिरताना ही काळजी घेतली नसती आणि खाकरा किंवा वेफर्सचा आवाज आला असता, तर पक्षी किंवा प्राणी कान टवकारण्याची शक्यता होती. यामुळे ते आत निघून गेले असते किंवा लपले असते, तर आम्हांला चालणार नव्हतं. आपलं अस्तित्व जंगलात प्राणी-पक्ष्यांइतकंच 'जंगली' असावं, असा मनापासून प्रयत्न होता. बाकी खाण्याचे वास घालवणं किंवा ते गायब करणं मला शक्य नव्हतं.

काऊंटरवर पैसे भरून कापडी पिशवी आणि रिसीट घेतली, तेव्हा आम्हांला गाडीचा क्रमांक मिळाला. त्यानुसार आम्ही जिप्सीत जाऊन बसलो. नंतर गाईड आणि ड्रायव्हरची एक जोडी जिप्सीत येऊन बसली. त्यांच्याशी ओळख करून घेऊन आम्ही निघालो. सिल्लारी गेटवर लाकडी आडव्या कमानीपाशी येऊन गाडी क्रमांक वगैरे नोंदवून आम्ही निघालो, आणि लक्षात आलं, की आमच्याआधी एकही जिप्सी अजून आत गेलेली नाही आणि आमचीच जिप्सी जंगलात जायला सकाळी सगळ्यात पहिली निघाली आहे.

जंगलात या गोष्टीला फार वेगळं महत्त्व आहे. अगदी पहाटेपासूनच जंगल जेव्हा जागं होत असतं, तेव्हा आळोखेपिळोखे देणारे काही प्राणी, काही पक्ष्यांचा सुरू असलेला ब्रेकफास्ट; ऑफिसला निघण्यासाठी आपली होते, तशी काही पक्षी-प्राण्यांची अन्नाच्या शोधात जाण्याच्या तयारीतील लगबग या सगळ्या हालचाली थेट त्यांच्या घरात जाऊन अनुभवण्यासारख्या असतात. आपल्याआधी कुणीही जंगलात गेलेलं नसतं. त्यामुळे 'अनडिस्टर्ब्ड' जंगलात शिरून पहिल्यांदा काही 'सायटिंग' झाल्याची मजा चाखायला विशेष भारी वाटतं. वाटतंच...

कमानीच्या शेजारच्या रस्त्याने आत शिरताच पहिलं स्वागत केलं, ते कॉटेजच्याही बाहेर बागडणाऱ्या लाल तोंडाच्या माकडांनी. मग दिसली काही चितळं... शांतपणे चरणाऱ्या 'स्पॉटेड डिअर्स'नी जिप्सीच्या चाहुलीने पहिल्यांदा कान टवकारले. या गाड्या रोजच्याच असल्याप्रमाणे त्यांच्यातल्या नराने आणि काही माद्यांनीही मग पुन्हा गवत चरण्यासाठी माना खाली घातल्यावर पिल्लांनीही नाश्ता पुन्हा सुरू केला. थोडं पुढे गेल्यावर जंगलाच्या दुतर्फा उंचच उंच वाढलेल्या गवतातून आमची जिप्सी पुढे गेली. जमिनीपासून एखाद्या झुडपापेक्षाही उंच वाढत गेलेल्या तिथल्या हिरव्यागार गवताच्या पात्याच्या अगदी टोकाजवळ आलेले लाल तुरे वाऱ्याच्या झुळकीनेही डुलत होते. तीन टप्प्यांत सीटची व्यवस्था असलेल्या जिप्सीच्याही वरपर्यंत हे गवत गेलं होतं. इतकं, की दुतर्फा वाढलेल्या गवतातून जिप्सी आत घातली, तर

शेजारून कुणी गेलं, तर कळूही नये.

जंगल अशा पद्धतीने अनुभवत असताना अचानक वाळूच्या पट्ट्यावर 'पगमार्क्स' दिसले. वाघाचे असावेत, असा अंदाज घेऊन आमची जिप्सी त्याच्या पावलांच्या दिशेने वळली. एका ओढ्यापाशी, त्यानंतरच्या ब्रिजजवळ जिप्सी थांबवून, थोडा वेळ वाट पाहूनही वाघ दिसण्याची काही शक्यता दिसेना, तेव्हा गाइड, ड्रायव्हरचे अक्षरश: चेहरे पडलेले आमच्या लक्षात आले. बोलण्यातूनही त्यांचा आवाज बदललेला जाणवला. पहिल्या तासाभरानंतर काहीसे निराश भाव चेहऱ्यावर दिसले, तेव्हा आम्ही त्यांना सांगून टाकलं, की 'आम्ही काही इथं फक्त 'टायगर' पाहायला आलो नाही. सहज दिसला, तर चालणारच आहे; पण त्यासाठी अट्टाहास करून बाकी पाहण्यासारखं जंगल घाईने दाखवू नका.'

मग जरा रिलॅक्स होऊन त्या दोघांनीही गवा दिसल्यावर गाडी थांबवली. दोन गवे आमच्या डाव्या बाजूने आणि दोन आमच्या उजव्या बाजूने झाडांचा पाला खात होते. ते चरणं अत्यंत निवांत होतं. जगदुनियेची काळजी नसल्यासारखं... तपकिरी, तांबूस अशी त्यांची तुकतुकीत कांती, काळेभोर डोळे आणि पांढरे मोजे घातल्यासारखे पाय पाहून आम्हांलाच त्या सकाळच्या थंडीत उबदार वाटू लागलं. थोडं पुढे गेलो,



तर मोठे पांढरे, टोकदार सुळे असलेल्या चार रानडुकरांनी धडाधड आमच्यासमोरून रस्ता क्रॉस करून जिप्सीला कचकन ब्रेकच मारायला लावले. एव्हाना कोतवाल (ड्रोंगो) आणि नकलाकार कोतवालाने आम्हांला मधूनमधून दर्शन दिलं होतं.

तलावाकाठी, पाणवठ्याजवळ दिसलेला खंड्या आधी शांत बसून होता. माझ्या मुलाला तो निळा रंग हिरव्यातूनही पुरेसा नीट लक्षात येईना, तेव्हा तो हलला, तरच दिसेल, असं माझ्या लक्षात आलं. माझ्या मनात हा विचार येईपर्यंत खंड्यालाच गवतात काहीतरी दिसलं आणि त्याने सगळा जोर लावून पंख पसरून हवेत झेप घेतली आणि गवताळ भागात जाऊन पटकन तोंडात काहीतरी पकडलं. बहुदा छोटा मासाच. ते निळसर, गुलाबी, केशरी असे रंगीबेरंगी पंख बघून त्या गार वातावरणात अंगावर शहारा आला.

तलावापाशी अक्षरशः भारावून जाणारं वातावरण होतं. दोन्ही बाजूंनी तलावाच्या मध्यापर्यंत आलेलं गवत स्तब्ध होतं. त्यावर दवबिंदूंचे टपोरे थेंब होते. तेही जमिनीच्या दिशेने झेपावून ओघळण्याच्या तयारीत असलेले. मात्र, त्यावर उगवत्या सूर्यकिरणांनी आपली नक्षी उमटवली होती आणि त्यात ते टपोरे दव चमकून उठले होते. झुडपांची एकसलग ओळ आणि अधूनमधून गवतांच्या वर आलेल्या पात्यांवरून उडणारी विविधरंगी फुलपाखरं,काही किरमिजी, तपकिरी आणि लालसर-हिरव्या अशा गडद रंगांची; तर अगदी रानटी वाटावेत, असे चतुर लक्षवेधी होते. खंड्या, पाणकोंबड्यांसारख्या पक्ष्यांचा जंगलातील मुक्त वावर विलोभनीय होता. इथली प्रत्येक गोष्ट रानावनाच्या नव्याने आणि पुन्हा पुन्हा प्रेमात पडावं,अशीच होती.

त्या शांत, स्तब्ध जलाशयाच्या कॅनव्हासपासून दूर जाऊच नये, असंच वाटत होतं. मात्र, आणखीही अज्ञात जंगल साद घालत होतं. पाणवठ्याजवळच्या पक्ष्यांप्रमाणेच उंच झाडांवर घरटी करून राहिलेल्या पक्ष्यांनी अन्नासाठीची शोधाशोध आरंभली होती. गाडी तलावापासून पुढे निघाल्यावर एक मोठा बारासिंगा शांतपणे गवत चरताना दिसला. हरीण कुळातली जनता सहसा एकटीच दिसणं अस्वाभाविकच. म्हणून आमची शोधक नजर मात्र माद्या आणि पिल्लं कुठे दिसतात का, याकडे वळली. थोडं लांबवर बारासिंग्यांचा कळप दिसला. गाडीच्या रस्त्यापासून पुरेसं अंतर लांब चरत असलेला. अत्यंत वळणदार अशी शिंगं डौलदारपणे मिरवत नर बारासिंगा कळपाचा राजा असल्याचं वागण्यातून थेट दाखवून देत होता. मात्र, त्याचा हा डौल ॲटिट्यूड न वाटता मार्दव आणि आब राखून असलेल्या संयमी, समंजस व्यक्तीसारखा असल्यामुळे हा बारासिंगा अत्यंत मोहक होता.

फक्त प्राणी, पक्षीच नाही, तर दोन झाडं सांधणारी कोळ्यांची जाळी, कधी पायवाटेच्या कडेला बिळ केल्यासारख्या जाळ्यांमध्ये शिकार करण्यासाठी दबा धरून बसलेले कोळी असे जैववैविध्य अनुभवाला येत होते. पहिली राइड संपून आम्ही पुन्हा कॉटेजमध्ये आलो. वेळेत जेवण केले नाही, तर दुपारच्या जिप्सी राइडला निघायला उशीर झाला असता; पण सकाळी लवकर उठलो असल्याने आम्ही जरा पडी मारायची ठरवली. गरमागरम पाण्याने अंघोळ करून झोपून उठलो, तोपर्यंत राइडची वेळ होतच आली होती. आता मात्र घाई करणं भाग होतं; कारण जेवणात वेळ घालवला, तर दुपारचा नजारा आम्ही 'ऑलमोस्ट मिस' करण्याचीच शक्यता होती.

त्यामुळे आम्ही सँडविच पार्सल घेऊन थेट जिप्सी गाठली. या राइडची सुरुवातच आम्ही सकाळी फिरून आलेल्या बखारी परिसरात जाऊन झाली. मात्र, 'इथं आम्ही सकाळीच येऊन गेलोय,' असं गाइड आणि ड्रायव्हरला आम्ही सांगण्याच्या प्रयत्नात असतानाच

माकडांनी 'कॉल' दिला. बिबट्या किंवा वाघ असेल, असं वाटून जिप्सी त्याने माकडांच्या आवाजाच्या दिशेने वळवली. बांबूच्या जंगलाने वेढलेला भाग असलेल्या वेणूबनातून जाताना अचानक समोरून काहीतरी पिवळ्या रंगाचं हलल्यासारखं जाणवलं. त्याच क्षणी तिथेच जिप्सी थांबवली. गाडीचा आवाज होऊ नये; म्हणून गाडी बंद केली. काही मिनिटं अंदाज घेऊन पुन्हा जिप्सी सुरू करून पुढे नेली, इतक्यात समोरून आलेल्या एका जिप्सीतील कुटुंब, आपण जंगलात आहोत, हे भान विसरून 'सेल्फी' काढण्यात आणि गप्पा मारण्यात रंगलं होतं. जंगलात मुळीच मिसळून न शोभणाऱ्या 'पॉप कलर'च्या पँट्स आणि तसलाच भडक केशरी, गडद निळ्या रंगाचा शर्ट असा पेहराव करून आलेल्या त्यांच्याकडे बघून, आता काही वाघ दिसण्याची संधी नाही, हे आम्ही अगदी पुरेपूर समजून चुकलो. मात्र, आमचे जिप्सीचे चालक आणि गाइड तरुण असले, तरी चलाख होते. त्यांनी एक विशेष कामगिरी पार पाडली.

'गंभीरपणे जंगल फिरायला आलेल्या आमच्या–सारख्यांना तरी नीट जंगल पाहू द्या,' असे दुसऱ्या जिप्सीचालकांना खुणेने सांगून त्यांनी दुसऱ्या जिप्सीला तिथून पळवून लावलं आणि असलाच वेणूबनात वाघ लपलेला, तर तो पाहायला आम्ही मोकळे झालो. भडकरंगी कपड्यांच्या मंडळींची जिप्सी तिथून हलताक्षणी चालकाने आम्हांला किंचित मान खाली वाकवून 'माझ्या बोटाच्या दिशेने आतपर्यंत पाहा,' असं सांगितलं. तसं नीट प्रयत्नपूर्वक पाहताच पूर्ण हिरव्या–पिवळ्या बांबूच्या झाडीत एक पांढऱ्या नाकाचा गुबगुबीत शेंडा ठळकपणे दिसला. माझ्या मुलालाही दिसला. मित्र किंचित आमच्या डावीकडे असल्यामुळे त्याला थोड्या प्रयत्नांनी मगच नीट वाघ दिसला. त्याचे शार्प डोळे आमच्याकडे थेट रोखून पाहात होते.

मग अचानक लक्षात आलं, की शेजारी दोन पिल्लंही दडून बसली आहेत. हळूच डोकावण्याचा प्रयत्न करताहेत. त्या अर्थी ही वाघीण आहे;वाघ नाही. हे लक्षात आल्याक्षणी तिची नजर का रोखली असावी, हेही तातडीने जाणवलं. आमच्या भटकंतीत जराही दुखू–खुपू नये; म्हणून माझ्या मुलाबद्दल मला वाटणारी काळजी तिलाही तिच्या पिल्लांबद्दल वाटली असेल, या विचाराने तिच्या तीक्ष्ण नजरेचा अभिमानच वाटला. नदीवरून पाणी पिऊन आलेली ती, वेणूबनातून पिल्लांसह रस्ता ओलांडून पलीकडे जाण्यासाठी थांबली होती. आम्ही तिच्या रस्त्यात होतो. आम्हांला वाघीण पिल्लांसह दिसल्याच्या आनंदात होतो. मग समजूतदारपणे आम्ही तिथून निघायचं ठरवलं.

फक्त जंगल मनमुराद फिरायचं, इतकीच माफक अपेक्षा ठेवून आलेल्या आम्हांला वाघाच्या दर्शनाने अविस्मरणीय आनंद दिला. पाच–सहा दिवसांची सफर आणि राइड करूनही अनेकांना वाघ सहज दिसत नाही. त्या मानाने सफरीच्या पहिल्याच दिवशी आम्ही वाघीण पाहिली, म्हणजे आम्ही चांगलेच नशीबवान ठरलो. ताडोबा, नागझिरा इथं पाणवठ्यावर आलेले वाघ पाहिलेली मी, माझ्यापेक्षाही मुलाच्या पहिल्याच जंगल सफरीत त्याला दिसलेल्या वाघामुळे मनापासून सुखावले. अर्थात, माझी ही पेंचच्या जंगलातली पहिलीच सफर होती.

'वाघीण आणि दोन्ही पिल्लं, त्यांचे इवलेसे डोळे,कान पाहून तुला कसं वाटलं,' असं मुलाला विचारलं, तेव्हा तो म्हणाला, 'आई, तेसुद्धा माणसातली आई आणि तिचं पिल्लू पाहायला आले होते. त्यांनाही हे विचारायला हवं, नाही का?'

माझी जंगल सफारी त्या क्षणी सार्थकी लागली.

**संपर्क : ८०८७६८९३४०**

# लोकसेवक

नूतन अशोक मुळणकर



ईश्वरीकृपा त्यांच्यावरी, छत्र धरूनी
संत झाले डेबूजी, लोकसेवक बनूनी...!! धृ !!

नव्हती किर्तनासाठी, सभा–मंडप तबला पेटी,
थोरासारखे वागावे, हीच सज्ञान दृष्टी,
नुसते तोंडाने नव्हे, प्रत्यक्ष अंग झिजवूनी,
संत झाले डेबूजी, लोकसेवक बनूनी...!! १ !!

नका करू फळाची इच्छा करा कर्म,
आई–वडलांची सेवा चाकरी हाची धर्म,
द्यावे सुख जिवंतपणी, हेची पुण्य सांगूनी,
संत झाले डेबूजी, लोकसेवक बनूनी...!! २ !!

लोकशिक्षणाची माला किर्तनात गुंफून,
जागा साफ करी, खराटा स्वत: हाती घेऊन,
कीर्तनासाठी विषय स्वच्छतेचा ठेवूनी,
संत झाले डेबूजी, लोकसेवक बनूनी...!! ३ !!

संपर्क : ७२१८६१६४८७




# रामभरोसे
## 'कानहलके आणि खजिन्याचे गुपित'

**रामभरोसेचं लांब झालेलं नाक पूर्ववत झालं मात्र इतरांच्या भानगडीत नाक खुपसण्याची त्याची वृत्ती कानाकडे सरकली, तो 'हलक्या कानांचा'झाला. याचं त्याला आणि त्याचं याला सांगण्याची नवी सवय जडल्यानं, नको ती गुपितं साठवून त्याच्या कानाच्या पाळ्या लोंबकळू लागल्या, त्या पार खांद्यापर्यंत आल्या. पुढे काय झालं ते वाचा 'कानहलके'च्या या दुसऱ्या भागात...**

कान जड होऊन लोंबकळत असलेल्या रामभरोसेच्या खांद्यांना आता कानाच्या पाळ्यांचा स्पर्श जाणवू लागला होता. दुपार झाल्या झाल्या सावकाराकडे जाऊन, त्याला नामदेवनं दुधात पाणी घातल्याचं सांगून टाकू म्हणजे कान हलके होतील म्हणून तो दुपार होण्याची वाट पाहू लागला. मात्र घरी येणारा–जाणारा प्रत्येक जण त्याच्या कानांकडे चकित होऊन पाहू लागला, प्रश्न विचारू लागला तेव्हा वैतागून रामभरोसेने फडताळातून काढून कानटोपी घातली आणि कान लपवून टाकले. त्याचा परिणाम मात्र भलताच झाला, ऐन उन्हाळ्यात कानटोपी घातल्याने आला–गेला प्रत्येक जण रामभरोसेच्या प्रकृतीविषयी चौकशी करू लागला. कधी एकदा दुपार होते असे त्याला झाले. आपण घराबाहेर पडलो आणि कुणाविषयी काही ऐकलं तर कान आणखी जड होतील म्हणून रामभरोसेला घराबाहेरही

पडण्याची इच्छा होत नव्हती. अखेर ‘दुपार होताच मला उठव’ असं आईला सांगून तो डोक्यावरुन पांघरूण घेऊन झोपून गेला.

दुपार होताच आईनं त्याला उठवलं, भराभरा तोंडावर पाणी मारून कानटोपी घालूनच तो घराबाहेर पडला. रस्त्यात भिम्या आणि तुक्या गप्पा मारत उभे होते. दोघेही निरुद्योगी आणि गावभर उगा भटकत राहणारे. त्यांना दुरून पाहूनच रामभरोसेने रस्ता बदलला, मात्र त्या दोघांनी रामभरोसेला पाहिले होते, ते त्याच्या मागे धावतच निघाले. त्यांना पाहून रामभरोसेही धावत सुटला. अखेर धापा टाकत टाकत तो एका जागी थांबला आणि त्याने लांबूनच विचारलं, ‘काय रे भिम्या, काय रे तुक्या, माझा पाठलाग का करताय?’ तुक्या म्हणाला, ‘तू का पळालास आम्हांला पाहून?’ भिम्या म्हणाला, ‘तेवढं विचारायलाच तुझ्या मागणं आलो आम्ही धावत.’ रामभरोसे श्वासावर नियंत्रण आणत म्हणाला, ‘तुम्हां दोघांना काही उद्योग नाहीत, कुणाविषयी काही बाही बडबडत असता तुम्ही. ते माझ्या कानांवर पडलं असतं तर माझे कान जड झाले असते, कारण मी खूप हलक्या कानांचा आहे. म्हणून पळालो मी.’

‘रामभरोसे कानहलक्या’ काय म्हणाला ते त्या दोघांनाही कळले नाही. राम्या बहुधा वेडा झाला आहे, असं एकमेकांना सांगत ते निघून गेले. राभरोसेनं मधली गल्ली धरली आणि सावकाराच्या घरी पोहोचला. सावकार नुकताच घरी आला होता, ते पाहून रामभरोसेला बरं वाटलं. तो सावकाराच्या कानाशी लागला आणि म्हणाला, ‘आज तुम्ही नाम्याकडून दोन शेर दूध मागवलं होतं ना, त्यात नाम्यानं अर्धा शेर पाणी घातलं होतं. मी स्वतःच्या कानांनी ऐकलं बघा.’ नाम्याची चुगली करताच रामभरोसेचे कान थोडे हलके झाले, मात्र सावकाराला नाम्याचा भयंकर राग आला. त्यानं बायकोला फर्मान सोडलं, ‘ते दूध आत्ताच्या आत्ता नाम्याला परत कर आणि आपले पैसे परत घेऊन




ये. मेहनतीचा पैसा आहे माझ्या, असा पाण्यात जाऊ देणार नाही मी.’ सावकाराची कजाग बायको आतून बाहेर आली आणि कमरेवर हात ठेवून नवऱ्याकडे रागानं पाहात म्हणाली, ‘माझ्या माहेरचे पाहुणे आले होते जेवायला, त्यांच्यासाठी खीर केली होती. नाम्याकडलं दूध गेलं खिरीत आणि खीर गेली पाहुण्यांच्या पोटात. आता मी काय त्यांची पोटं फोडून दूध बाहेर काढू?’ बायकोचा वर चढलेला पारा पाहून सावकाराच्या मिशा खाली पडल्या. हात कमरेवर तसेच ठेवत बायको सावकाराला म्हणाली, ‘याला लुबाड, त्याला लुबाड, याचं सोनं खा, त्याची जमीन गीळ असले उद्योग आहेत तुमचे. याला काय मेहनतीची कमाई म्हणतात?’

रामभरोसेनं ते ऐकलं, मात्र एकाच वेळी सावकाराविषयी एवढ्या गोष्टी त्याच्या बायकोकडूनच ऐकल्यामुळं त्याचे थोडे हलके झालेले कान पुन्हा जड झाले आणि अधिकच लोंबकळून ते चक्क कानटोपीतूनही बाहेर आले. सावकार चकित होऊन पाहू लागला तेव्हा रामभरोसेच्या ते लक्षात आले. कसे बसे कान टोपीच्या आत ढकलून तो चटकन तिथून बाहेर पडला. दोन मोठी गुपितं त्यानं कानात दडवून ठेवली होती. आता तर राजाला भेटणं फारच आवश्यक होतं. रामभरोसे तिथून बाहेर पडला तर त्याला संपत मारवाडी

आणि आबुराव येताना दिसले. संपत म्हणाला,'अरे आम्ही तुलाच शोधत होतो. आबुरावनं माझी मुलगी नकटी असल्याचं सांगितलं त्याचा फायदा झाला बघ. त्या मुलाला नकटी मुलगीच हवी होती, त्यानं लगेचच होकार दिला. हे घे पेढे.' 'बरं बरं. चांगलचं झालं की मग..'असं म्हणंत रामभरोसे कानहलक्या राजाच्या महालाकडे निघाला. सावकाराच्या लबाडीचं आणि खुद्द राणीच्या चोरीचं गुपित राजालं सांगितलं की आपले कान हलके होतील आणि शिवाय बक्षीसही मिळेल, म्हणून तो लगबगीनं निघाला होता. आता रस्त्यात कोणाही भेटलं तरी अजिबात थांबायचं नाही, काही ऐकायचंही नाही असा निर्धार त्यानं केला होता. चालता चालता वेग वाढून धक्का लागायचा आणि त्याचे लोंबलेले कान टोपीबाहेर यायचे, ते तो पुन्हा पुन्हा आत ढकलत होता.

रामभरोसे महालात पोहोचला तेव्हा दारातच त्याला पहारेकऱ्यानं अडवलं. रामभरोसे नेहमीचा असला तरी महाराजांकडून वर्दी आल्य़ाशिवाय भलत्या वेळी कुणालाही आत सोडलं जात नसे. रामभरोसे त्याला म्हणाला, 'मला आता जाऊ दे, खूप महत्त्वाचं बोलायचं आहे महाराजांशी.' पहारेकरी म्हणाला, 'तू कानटोपीत काय दडवलं आहेस ते दाखव मला आधी. एखादा जंबिया वगैरे असेल तर तू महाराजांशी दगा फटका करशील, काय सांगावं.' रामभरोसेचा नाइलाज झाला, त्यानं टोपी काढली, मात्र ती काढताच त्याचे कान लोंबून थेट हाताच्या कोपरांपर्यंत आले. तो अजिजीनं पहारेकऱ्याला म्हणाला, 'बघ, माझ्या कानांत खूप गुपितं साठली आहेत, म्हणून असं झालंय, महाराजांना सगळं सांगितलं की होतील कान पूर्ववत.'

पहारेकऱ्यानं त्याला आत सोडलं, कानांवर टोपी चढवून रामभरोसे महाराजांच्या कक्षाकडे निघाला. कक्षासमोर पोहोचताच तिथल्या पहारेकऱ्यानं त्याला अडवलं. डोक्यावर टोपी किंवा काहीही चढवून महाराजांसमोर जाण्यास परवानगी नव्हती. रामभरोसेला नाईलाजानं टोपी काढून आत जावं लागलं. महाराज आणि महाराणी सोंगट्या खेळत बसले होते. दोघेही रामभरोसेकडे पाहून हसू लागले.'काय रे कानहलक्या, काय झालं एवढं घाईघाईनं यायला?' राजानं विचारलं. महाराजांच्या शेजारी महाराणीला पाहून रामभरोसे



चपापला, आता मनातलं कसं सांगावं या काळजीत तो पडला आणि म्हणाला, 'महाराज, महाराणींसमोर नाही सांगता येणार मला ते.' राजा म्हणाला, 'मी तुला अभय देतो, तू काहीही सांगितलंस तरी तुला कोणी काही बोलणार नाही. न घाबरता सांग सगळं.'

मग रामभरोसेनं आधी सावकाराची कागाळी केली आणि मग बिचकत बिचकत राजाच्या दूताकडून मिळालेली माहितीही सांगून टाकली. ती ऐकून राजा आणि राणी दोघेही हसू लागले. रामभरोसेला कोडं पडलं, आपण काही चुकीचं तर बोललो नाही ना?

राजा म्हणाला, 'अरे मूर्खा, तुझं एकदा नाक कापलं गेलं तरी कानांद्वारे पुन्हा तुझे तेच उद्योग सुरू आहेत तर. कानांवर पडतं ते सगळंच खरं असतं, वाईट हेतूनं बोललेलं असतं असं तुला वाटतं का? कुणी लांडी लबाडी केलीच तर त्याला पकडण्यासाठी राज्यात वेगळी व्यवस्था आहे. हा सावकार सारखा घराबाहेर राहतो कारण तो आपला गुप्तहेर आहे. हा लोकांना फसवतो असं घरातल्यांनाही वाटतं, म्हणजे तो किती चांगला गुप्तहेर असेल विचार कर. रामभरोसे खाली मान घालून उभा राहिला. मग राणीसाहेबही हसत म्हणाल्या, राज्याच्या खजिन्यातले थोडे थोडे हिरे, मोती आणि सोन्याचे दागिणे मी चुपचाप माझ्या माहेरी पाठवते हे मात्र खरे आहे. रामभरोसेचे डोळे चकाकले, त्याला वाटलं चला, एक गोष्ट तरी खरी निघाली आपली. पण राजा म्हणाला, एकदा राज्यावर आक्रमणाचं संकट आलं त्याची चाहूल तुझ्या लांब नाकानंच दिली होती. पण तसं संकट पुन्हाही येऊ शकतं ना? त्यामुळे आपला खजिना एका जागी न ठेवता चार जागी ठेवतो आपण. त्या जागांना आपण 'राणीसाहेबांचं माहेर' असं कळीचं नाव दिलं आहे.

रामभरोसेने आपले लोंबलेले कान धरले आणि राजापुढे लोटांगण घालत म्हणाला, 'सरकार चुकलं माझं. फारच हलक्या कानांचा झालो आहे मी. यापुढे ऐकलेलं सगळं कानात साठवून ठेवणार नाही मी.पण आता या कानांचं काय करू ते कळत नाही.'

राजानं टाळी वाजवली, एक सेवक आला. राजा त्याला म्हणाला, याला आपल्या साधूमहाराजांकडे घेऊन जा. सेवक रामभरोसेला घेऊन गेला. साधू महाराजांनी रामभरोसेकडे पाहून छान स्मित केलं आणि विचारलं, 'तुला कान फुंकणे म्हणजे काय ते माहिती आहे का?'

'होय महाराज, कुणीतरी येऊन कुणाची तरी कागाळी करतो आणि आपण खातरजमा न करताच त्यावर विश्वास ठेवतो, म्हणजे आपले कुणीतरी कान फुंकले आहेत असं म्हणतात.' रामभरोसे म्हणाला. साधू महाराजांनी रामभरोसेच्या पाठीवर हात ठेवला आणि म्हणाले, 'तू याच्याही पुढची मजल मारली, तुला कोणी काही कानांत सांगत नव्हता, पण ऐकलं ते सगळं खरं आहे, असं तूच समजत होतास. म्हणून तुझे कान आधी हलके झाले आणि अशा खोट्या गोष्टींनी ते जड झाले.'

'महाराज, यातून माझी सुटका करा, यापुढे असं करणार नाही', म्हणत रामभरोसेनं हात जोडले.

'ये इकडे' म्हणत साधू महाराजांनी रामभरोसेला जवळ ओढलं आणि म्हणाले, 'लोक काय म्हणतात ते या कानानं ऐकायचं आणि त्यातलं आवश्यक तेवढं लक्षात ठेवून बाकीचं दुसऱ्या कानानं सोडून द्यायचं. मुख्य म्हणजे कागाळ्या करायच्या नाहीत.' रामभरोसेनं मान हलवताच साधू महाराजांनी त्याच्या एका कानात जोरदार फुंकर मारली. त्याबरोबर कानात साठलेली सर्व अनावश्यक गुपितं आणि कचरा दुसऱ्या कानातून हवेसोबत बाहेर पडू लागला. थोड्या वेळात कचरा बाहेर पडल्यावर रामभरोसेचे कान पूर्ववत झाले. साधू महाराजांच्या पाया पडून तो बाहेर पडला तेव्हा त्याला हलकं हलकं वाटत होतं. आता कुठं नाक खुपसायचं नाही आणि नको त्या गोष्टी ऐकायच्याही नाहीत, अशी पुन्हा एकदा त्यानं शपथ घेतली.

**संपर्क : ९८९२४१९२६७**



डॉ. संजय ढोले

# छुपाडोळा

"राजू बाळा.. आज कुठं जायचं ते सांग. तू सांगशील तिथे जाऊ.'' डॉ. किरण तमखाने, राजूचा मामा, उठल्या उठल्या सोफ्यात बसत म्हणाला.

राजू आधीच लिव्हिंग रूममध्ये येऊन, टीव्हीवर डिस्कव्हरी चॅनेल लावून आरामात लोळत बसला होता. मामाचे शब्द ऐकताच तो उठून बसला. चेहऱ्यावर आनंद झळकून गेला. उत्साहानं म्हणाला,

''खरंच मामा, आजही बाहेर जायचं? तुला वेळ आहे?''

''हो... खरंच जायचंच की, फक्त कुठं जायचं ते तू सांगायचं.''

डॉ. किरण राजूच्या मनात शिरत म्हणाले. डॉ.किरण, हे आयुका संस्थेत शास्त्रज्ञ असल्याने, त्यांची व्यस्तता राजूला माहीत होती. राजू थोडा वेळ विचार करीत म्हणाला.

''मला एखादी प्रयोगशाळा किंवा संशोधन संस्थेला भेट द्यायला निश्चित आवडेल.''

राजूचं मन डॉ. किरणना माहीत होतं. तो असंच काहीतरी वेगळं सांगेल याची त्यांना खात्री होती.

''मग झालं तर. आज आपण खोडदला जाऊ या. महाकाय दुर्बीण बघायला.'' डॉ. किरणनं सांगताच, राजू उत्साहानं उठत म्हणाला,

''मामा, म्हणजे जी.एम.आर.टी.त ना. जायंट मिटर रेडिओ टेलेस्कोप?''

''अरे! हे, तुला माहीत आहे.'' डॉ. किरण आश्चर्याने उत्तरले.

''मग तर! आमच्या आठवीच्या विज्ञान तंत्रज्ञान पुस्तकात त्याचा उल्लेख आहे. माझ्या मित्रांना मी हेही सांगायचो की माझा किरण मामा येथे शास्त्रज्ञ आहे.'' राजू अभिमानाने बोलला होता.

''होय मामा! या राजूला सर्व काही माहीत असतं. सगळं जगच त्याच्या डोक्यात आहे.''

आक्का, राजूची मोठी बहीण, किचनमधून चहाचा ट्रे हातात घेऊन लिव्हिंग रूममध्ये येत म्हणाली होती. तिच्या बोलण्यात कौतुक होतं. तिचं नाव सुनंदा असलं तरी, राजू तिला 'आक्का' म्हणत होता. म्हणून सर्वच या नावाने तिला बोलत असत. आक्कानं किरण मामा व राजूच्या हातात चहाचा कप दिला. चहाचा एक घोट घेत राजू म्हणाला,

''आक्का, तूपण चल खोडदला. मजा येईल. २५-३० किमीच्या परिघात पंचवीस ॲन्टेना आहेत म्हणे आणि ते रात्रंदिवस अंतराळात दूरवर आकाशगंगांचा वेध घेतात म्हणे. नाही का मामा?''

''अरे! हो बरंच माहीत आहे तुला. राजू बाळा कुठून शिकतोस तू हे सगळं?'' डॉ. किरण कौतुकाने त्याच्या केसांत हात फिरवत म्हणाले.

''मामा सारखं वाचन आणि तू दिलेल्या मोबाइलमध्ये असतो. माहीत असणारच त्याला. राजू, अरे. माझं काय काम. तुम्ही जा. मी येथेच थांबते.''

''काय हे आक्का. चल ना मामा सांग ना तिला.'' राजूचा आग्रह.

''आक्के! चल. आपण तिघं मुक्कामालाच जाऊ. तिथं छान गेस्ट हाऊस आहे. मस्त खाऊ पिऊ. राजूला दुर्बीण दाखवून नियंत्रण कक्षही दाखवतो आणि बरं का राजू. तिथे टेरेसवर अतिशय शक्तिशाली दुर्बीणही आहे. तिचा वापर करून तू रात्री अवकाशातील दूरवर तारे, समूह, ग्रह यांचाही शोध घेऊन पाहू शकतो. आय ॲम शुअर यू विल एन्जॉय. आक्का तूपण बघच. हे अंतराळ कसं असतं ते. चला तर मग. मी आवरून माझ्या आयुकाच्या प्रयोगशाळेत जाऊन येतो. तोपर्यंत तुम्ही आन्हिके आटोपून, नाष्टा करा. आपण दुपारी खोडदला निघू.'' डॉ. किरण उठत म्हणाले होते. त्यांनी आवरायला घेतलं होतं.

राजूसोबतच आक्काचाही चेहरा खुलला होता. आक्का किचनमध्ये परतली होती तर राजू डिस्कव्हरी चॅनेलवरील अंतराळाचा वेध घेणारी मालिका पाहण्यात व्यग्र झाला होता.

राजू. राजू फिरके. त्याची बहीण आक्का. ती दहावीत तर हा आठवीत. पुण्याला आयुका संशोधन संस्थेत शास्त्रज्ञ असणारे त्यांचे मामा डॉ. किरण यांच्याकडे सुट्टीसाठी आला होता. मामाकडे आला म्हणजे राजूची बौद्धिक रेलचेल असायची. त्यामुळे तो खूश असायचा. डॉ. किरण यांचं खगोलशास्त्रात मोठं

योगदान होतं आणि ते मोठे शास्त्रज्ञ आहेत, हे राजूला माहीत होतं. विज्ञानातील काहीही अडचणी आल्या तर तो हक्काने मामाला विचारायचा.

दुपारी डॉ. किरण येताच, राजू व आक्का तयारच होते. तिघांनीही मुक्कामाच्या दृष्टीने थोडं सामान घेऊन, कारमध्ये बसले. डॉ. किरणने कार आयुकाच्या गेटमधून बाहेर काढली. शेजारीच राजू बसला होता तर आक्का मागे बसली होती.

डॉ. किरणने नाशिक रोडवरनं कार सुसाट वेगाने चालवायला सुरुवात केली. मंचर, नारायणगाव पार करताच, उजवीकडे कार खोडदच्या रस्त्याला लागली होती. हवेत गारठा होता. आल्हाददायक वातावरण होतं. निसर्ग बहरला होता, राजूच्या मनातील प्रश्नांचं निराकरण करीत डॉ. किरण व राजू निसर्गाचा आनंद लुटत होते. काही महाकाय अॅन्टेनाही दिसत होत्या.

थोड्याच वेळात कार गेस्ट हाऊसला येऊन थांबली. आक्कानं सामानाची बॅग हातात घेतली. गेस्ट हाऊसचा परिसरही छान होता. प्रशस्त रूममध्ये राजूनं यथेच्छ लोळण घेतली.

सूर्य अस्ताला जायला अजून बराच वेळ होता. डॉ. किरणने, राजू व आक्काला, जवळच असलेला असा एक महाकाय अँटेना जवळून दाखवला. त्याचा परीघच पंचवीस मीटरचा होता. त्यातील पदार्थ, संवेदके सर्व काही किरण मामांनी समजावून सांगितलं. आक्काच्या फारसं पचनी पडत नव्हतं. पण हे सर्वच विज्ञानच अद्‌भुत असल्याचं तिला जाणवत होतं. राजू मात्र बरंच काही विचारत होता. तो म्हणाला,

''मामा! असे किती अँटेना आहेत.''

''असे पंचवीस आहेत... आणि त्याची व्याप्ती २५ कि.मी. पर्यंत आहे.''

मामा नेमके हे काय करतात? ''राजूचा प्रश्न.''

''राजू! कित्येक प्रकाशवर्ष दूरवर असणारे तारे, ग्रह, मालिका आणि आकाशगंगा यांच्याकडून येणारे असे क्षीण संकेत या ग्राहकांद्वारे पकडले जातात. आणि नियंत्रण कक्षात त्याचे रात्रंदिवस विश्लेषण केले जाते.'' डॉ. किरणने स्पष्ट केलं.

''म्हणजे मामा नेमकी काय माहिती?'' राजूनं पिच्छा पुरवला.

''म्हणजे... पृथ्वीसारखे ग्रह आहेत का? सूर्यासारखे तारे आहेत का? किंवा एखादी जीवसृष्टी आहे का. या सर्वांचा वेध ही महाकाय दुर्बीण घेते आणि बरं का आक्का आणि हे सातत्याने चोवीस तास सुरू असते. डोळ्यांत तेल घालून.''

आक्का नुसतीच बघत होती.

''आतापर्यंत काही शोध लागलाय मामा?'' राजूचा सरळ प्रश्न.

''नाही. पण शोध चालू आहे. चला आता आपण नियंत्रण कक्षात जाऊ.''

तिघेही कारमध्ये बसले व मुख्य इमारतीकडे आले होते.

डॉ.किरणने अद्ययावत संगणक व यंत्रणा असणारा नियंत्रण कक्ष राजूला दाखवला. राजू चोही बाजूला संगणक व पडद्यावरील संकेतांची हालचाल बघून हरखून गेला. आक्का फक्त विस्फारल्या डोळ्यांनी बघत होती. राजूने या वेळीही डॉ. किरणना असंख्य प्रश्न विचारून घेतले. तेथे उपस्थित शास्त्रज्ञ, तंत्रज्ञही राजूच्या प्रश्नांनी आश्चर्यचकित झाले होते.

डॉ. किरण, राजू व आक्का गेस्ट हाऊसमध्ये परतले होते.

बाहेर अंधारून आलं होतं. निखळ चांदणं पडायला सुरुवात झाली होती. साधारण साडे आठ, नऊ वाजता जेवणं आटोपून, डॉ. किरण, राजू व आक्काला घेऊन,

शेजारीच असलेल्या प्रयोगशाळेवरील गच्चीवर आले. तेथेच शक्तिशाली दुर्बीण अवकाशाचं अवलोकन करण्यासाठी बसवली होती. आता चांगलंच चांदणं पडलं होतं. रात्रीचे दहा वाजले होते. वातावरण शांत व निखळ स्वच्छ होतं. त्यामुळे प्रत्येक तारा डोळ्यानेही दिसत होता. डॉ. किरणने दुर्बिणीचा ताबा घेतला व अवकाशातील दृश्य सेट करू लागले.

डॉ. किरणने राजू व आक्काला बुध, मंगळ, गुरू, शुक्र, शनी, युरेनस ग्रहांसोबतच सूर्यमालिका, त्यापलीकडील ग्रह, तारे व शेवटी देवयानी आकाशगंगेचं रूप दाखवलं. आक्काला हे नवीनच होतं. पण राजू मात्र विचार करू लागला होता. प्रत्येक ग्रहाचं चित्र तो मेंदूत साठवू लागला. डॉ. किरण घड्याळाकडे पाहत म्हणाले,

''राजू. आता रात्रीचे साडे अकरा वाजलेत. मी आणि आक्का थोडा वेळ बसतो. तू मनसोक्त या अवकाशात विहार कर.''

डॉ. किरणने परवानगी देताच, राजूनं दुर्बिणीचा ताबा घेतला आणि तो या अवकाशातच विहार करू लागला. अगदी भान हरपून, दुर्बिणीच्या साहाय्याने तो कित्येक प्रकाशवर्षे दूर जाऊ लागला. पुनश्च वेगवेगळे तारे, ग्रह बघून तो हुरळून गेला आणि पण क्षणात तो विचलित झाला. त्यानं मान बाजूला नेली. पुनश्च दुर्बीण ज्या दिशेला होती, तिकडं पाहिलं आणि त्यात काहीतरी अदृश्य, लपलेली पण अस्तित्वात असलेली हालचाल दिसली. क्षणासाठीच. पुन्हा पाहिलं तर दिसेनाशी झाली. तो क्षण मात्र त्याच्या मेंदूतच राहिला. पुन्हा पाहिलं तर ती वस्तू मात्र दिसली नाही. तेवढ्यात डॉ. किरणमामाचा



आवाज आला.

''राजू. निघायचं का बाळा. रात्रीचे साडे बारा वाजलेत. आक्कालाही झोप येत आहे.''

दुर्बीण त्याच दिशेला ठेवून, मनात विचारांचं काहूर घेत राजू उत्तरला.

''हो झालंय मामा. खूपच सुंदर. चला जाऊ या.''

दुर्बीण तशीच ठेवून, तिघेही गेस्ट हाऊसमध्ये आले. मामाला जे जाणवले ते सांगावे का? या विचारात असतानाच डॉ. किरण व आक्का झोपेच्या अधीन झाले होते.

राजू मात्र जागाच होता. ती अदृश्य वस्तू त्याच्या मनातून जात नव्हती. तो ग्रह नव्हता एवढं मात्र निश्चित. पुन्हा खात्री करून घ्यावी का? त्याच्या मनानं उचल खाल्ली. घड्याळात पाहिलं. दीड वाजला होता. त्याने निर्णय घेतला. पुनश्च एकदा खात्री करून घेण्यासाठी त्याने गच्चीवर जायचा निर्णय घेतला.

राजू हळूच उठला. मामा व आक्का गाढ झोपले होते. राजू वेगाने गच्चीवर आला होता आणि अधीरतेने दुर्बिणीचा ताबा घेत त्याने अवकाशात नजर टाकली आणि ती वस्तू त्यास पुन्हा दिसली आणि क्षणात लुप्त झाली. त्याचं हृदय धडधडलं. ती निश्चितच वेगळी वस्तू असल्याचं त्याच्या मनानं घेतले. आता खात्री झाली होती. मामाला याविषयी सांगालाचं हवं म्हणून तो वेगाने गेस्ट हाऊसमध्ये परतला व डॉ. किरणजवळ येत म्हणाला,

''मामा ऽऽ..'' राजूनं हळूच हाक मारली.

डॉ. किरण दचकून उठले. समोर राजूला पाहताच म्हणाले,

''राजू, तूऽऽ..? काय झालं?''

''मामा ऽऽ'' आणि क्षणात त्यानं सर्व सांगितलं. डॉ. किरणचा राजूवर विश्वास होता. तो छोटा वैज्ञानिकच होता. नाईट ड्रेसवरच डॉ. किरण राजूला घेऊन गच्चीवर आले होते. आवेगाने डॉ. किरणने दुर्बिणीची दिशा न बदलता अवकाशात पाहिलं आणि त्यांनाही तोच अनुभव आला. कुठलीतरी वस्तू तिथं लपून बसली होती. अनुभवानं मात्र त्यांना ते कुठलंतरी यानं असल्याचं जाणवलं. किमान पाचशे प्रकाशवर्षे अंतरावर असणारं. त्यांनी तत्काळ हालचाल केली. राजूकडे पहात म्हणाले,

''शाब्बास राजू! तुझ्या निरीक्षण शक्तीला दाद दिली पाहिजे. तिथे काहीतरी आहे एवढे मात्र निश्चित. त्याचा संकेत निश्चित नियंत्रण कक्षात आला असेल. चला आपण आत्ताच जाऊ. वेळ घालवायला नको. कारण ही अद्‌भुत व तेवढीच अनोळखी अशी वस्तू आहे. चलऽऽ.''

दोघेही तसेच नियंत्रण कक्षात आले होते. रात्रीचे तीन वाजले होते. तेथे एक शास्त्रज्ञ काम करीत होता. डॉ. किरण म्हणाले,

''शामलऽऽ काही अनोळखी असे संकेत मिळत आहेत का?''

''नाही सर!''

एकदा बघ तर? डॉ. किरणचा आग्रह.

शामलनं पुढची दहा मिनिटे शोध घेतला. पण अनोळखी असं काहीच नव्हतं. डॉ. किरण म्हणाले.

''अतिसूक्ष्म तरंगांची यंत्रणा सुरू करा.''

शामलनं लागलीच क्रिया केली... आणि तो पुढच्याच क्षणी म्हणाला,

''सर! हे बघा. हा अति क्षीण संकेत येथे दिसतो आहे. अनपेक्षित. आय डोंट नो कमिंग फ्रॉम व्हेअर.''

डॉ. किरणच्या लागलीच लक्षात आलं आणि त्यातील गंभीरताही. ती वस्तू दुसरं काही नसून, यान आहे. पण ती लपलेली का आहे. त्यांना कळत नव्हतं. त्यांना खात्री करून घ्यायची होती.



''शामल!''

''येस सर!''

''तू जगातील सर्व महत्त्वाच्या दुर्बिणींच्या संपर्कात आहे ना?''

''येस सर! मुख्य म्हणजे नासा, हवाई, दक्षिण आफ्रिका, चिले, ॲरिझोना, स्पेन येथील दुर्बिणींशी आहे.'' शामलनं माहिती दिली.

''मग लागलीच त्यांना संपर्क करून, ह्या संकेताची खात्री करून घ्या.''

''सर! जेम्सवेब दुर्बिणीलाही कळवू का?''

''होय! खरं तर दुर्बिणीच्या हे लक्षात यायला हवं होतं. पण एनी वे. बी फास्ट.''

''येस सर!''

डॉ. किरण व राजू बाहेर पडले. पहाटेचे पाच वाजले होते. राजू निश्चिंत झोपला होता. तर डॉ. किरणची मात्र झोप उडाली होती. पृथ्वीवर काही आरिष्ट तर नाही ना याची त्यांना काळजी वाटत होती.

दुसऱ्या दिवशी सकाळीच डॉ. किरण, राजू व आक्का आयुकात परतले होते आणि त्या क्षणापासून अविरत तीन दिवस डॉ.किरण क्वॉर्टरमध्ये आलेच नव्हते. ते नॅशनल सेंटर फॉर रेडिओ ॲस्ट्रॉनॉमी संस्थेतच होते. तसा निरोप राजू व आक्काला दिला होता.

चौथ्या दिवशी क्वॉर्टरमध्ये येत डॉ. किरण म्हणाले,

''राजू! बाळा. तू नेमका कशाने बनला आहे माहीत नाही. पण तू खूप छान काम केले आहे. चल!''

''कुठं!... मामा?''

''एन.सी.आर.ए च्या संचालकांनी तुला बोलवलं आहे''.

''पण का मामा?''

''तुला कळेल.'' आक्का आम्ही येतो. तुझ्या भावाने खूप मोठं काम केलंय. आक्का पाहतच राहिली होती.

डॉ. किरण व राजू. संचालकांच्या केबिनमध्ये हजर झाले. संचालक डॉ. कपाही उठत व हसत म्हणाले,

''कम ऑन माय बॉय. राजू. वेल डन.''

त्याचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. राजूला काहीच कळत नव्हतं. त्यानं डॉ. किरणकडे गोंधळून पाहिले.

''राजू!, डॉ. कपाही हे खूप मोठे खगोलशास्त्रज्ञ आहेत. काल जे काही अवकाशात तू शोधलं त्याचाच हा सन्मान आहे.'' डॉ. किरण अभिमानाने बोलत होते. तर डॉ. कपाही स्मित करीत होते. इतर दोघेही कौतुकाने पाहत होते. राजू म्हणाला,

''मामा! मलाही उत्सुकता आहे. ती वस्तू नेमकी काय होती?''

एक मिनिट. मी तुला सविस्तर सांगतो. राजू तुझ्या समोरच शामलने पृथ्वीवरील इतर सर्व शक्तिशाली दुर्बिणींशी संपर्क साधला होता. त्यांनाही तो क्षीण संकेत मिळाला होता. पण कळत नव्हतं. शेवटी दीड लाख कि.मी.वर असणाऱ्या आपल्या जेम्स वेब दुर्बिणीने त्या वस्तूचं चित्रच पाठवलं. ते एक यान होतं.''

''यान?'' राजू उडालाच.

''नुसतं साधसुधं यान नाही तर प्रतिवस्तूने बनलेलं ते यान होतं.'' राजू. डॉ. किरण उत्तरले.

''मामा प्रतिवस्तू म्हणजे?'' राजूचा प्रश्न.

''राजू बाळा, जसा मोठा होशील तसं तुला कळेलच. पण जसे अणुकेंद्रकामध्ये प्रोटॉन, न्यूट्रॉन व त्याच्या भोवती इलेक्ट्रॉन असतात आणि त्याचा अणू होतो. अशा अणूंनी वस्तू बनते. हे तू शिकला आहेस. आपली आकाशगंगाही वस्तूंनी बनलेली आहे. तू आणि मीही अणूंनी बनलो आहोत. पण जर का त्या केंद्रकात प्रतिप्रोटॉन, प्रतिन्यूट्रॉन व भोवती पॉझिट्रॉन असतील तो प्रतिअणू होईल. अशा प्रतिअणूंनी प्रतिवस्तू बनते. असे वस्तू आणि प्रतिवस्तू एकत्र आले तर विनाश पावतात.''

''म्हणजे मामा ते यान प्रतिवस्तूंचं होतं?'' राजूची रास्त शंका.

''हो! अगदी बरोबर आणि त्याची धडक पृथ्वीला झाली असती तर पृथ्वीचा विनाश होता आणि मानवसृष्टीचाही.''

''मग मामा! ते प्रतिवस्तूंचं यान गेलं कुठं?''

''राजू. आपल्या नासातील शास्त्रज्ञांनी अतिशय खुबीने त्याचा अंतराळात विनाश घडवून आणला. खरं तर त्यांच्या मते त्या यानात खूप प्रगत जीवसृष्टी होती की जी प्रतिवस्तूने बनलेली होती. म्हणूनच राजू बाळा. तुझ्या हे लक्षात आल्यामुळे पृथ्वी वाचू शकली. म्हणून तुझा हा सत्कार.'' डॉ.किरणनं सर्व सांगितले. डॉ.कपाही पुढे म्हणाले,

''आणि बरं का राजू. तुझे मामा व जगातील सर्व शास्त्रज्ञच यावर गेली तीन चार दिवस काम करीत होते. आणि छुप्या डोळ्यांचा नायनाट केला. बेटा, यू हॅव डन व्हेरी गुड जॉब. पृथ्वीला वाचवलंस तू. पुढे तू खूप मोठा शास्त्रज्ञ होशील.'' आणि संचालक डॉ. कपाहींनी राजूला कवेत घेतलं होतं. डॉ. किरणच्या डोळ्यांत अश्रू होते, तर तिथे उपस्थितांनी टाळ्या वाजवल्या होत्या.

**संपर्क : ९३२५६८८८३७**

# 'बी' चे मागणे

महेंद्र रा. सावंत

अरे मी, मी बी बोलतेय,
मनीचं सारं गूढ उकलतेय ।।
कोठे, कोठे जाऊन मी आता पडणार,
जीवन माझे व्यर्थ तर नाही ना ठरणार.
विचारानेच या मी किती रे झुरतेय....
मला हवा आहे केवळ मायेचा ओलावा,
थोडीशी ऊब अन जलबिंदूंचा शिडकावा
पहाच मग कशी मी बहरतेय...
तू मला फक्त पेरून तर बघ,
थोडासा जीव लावून तर बघ,
जीवनभर छत्रछाया बनून कशी मी राहतेय...
घेऊन तर पहा जरा माझाही ध्यास,
देईन तुजला अखंड मोकळा श्वास,
तुझ्या आणि तुझ्याच भल्यासाठी की रे सांगतेय...
दिसले आज जरी टाकाऊ क्षुद्र बी,
व्यापून टाकीन तुझे अवघे जीवन मी,
सार्थक व्हावे दोघांच्याही जिवांचे, म्हणूनच म्हणतेय...
तुझ्या जीवनाला चव मी आणीन
तुझा क्षणन् क्षण सुगंधित मी करीन
तुझ्या सेवेसाठीचीच स्वप्ने की रे पहातेय...
आता, एकच आर्त विनंती रे तुजला
एकदा जीवदान तर देऊन पहा मजला,
पहा जीवनभर, मी किती जीव पोसतेय...
दुष्टपणे नको रे फेकूस तू मजला,
माझ्यातही आहे एक जीव दडता,
काय सांगू या उपरी आता,
माझ्या जगण्यातच तुझं जगणं ही दडलेय...



संपर्क : ९५९४९०६५६२

प्रा. डॉ. गणेश राऊत

# दिंडोरीची लढाई

डोंगरगावातील शाळेची घंटा वाजली आणि मधमाशांनी पोळं भरलेलं असावं तशी मुलं वर्गामध्ये बसली. एवढ्यात मुख्याध्यापकांच्या लक्षात आले की, एका वर्गात गलका चालू आहे.

वर्गाच्या दिशेने मुख्याध्यापक येताना बघून विद्यार्थी शांत झाले. ते याच वर्गावर पूर्वी वर्गशिक्षक होते. सगळ्या मुलांशी त्यांचा परिचय होता. मुलांना जुने दिवस आठवले. पोरं एकासुरात ओरडली, 'गुरुजी, गोष्ट सांगा'.



गोष्ट सांगण्यात गुरुजींचा हातखंडा. पंचक्रोशीत त्यांच्यासारखा कथेकरी नव्हता. त्यांनी विचारले की, 'हा महिना कोणता'?

मुलं-मुली ओरडली - 'फेब्रुवारी'.

'फेब्रुवारी महिन्याचे विशेष काय'? - मुख्याध्यापक.

'छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म' - विद्यार्थी म्हणाले. 'चला तर मग त्यांचीच गोष्ट सांगतो'.

'नेहमीपेक्षा वेगळी कथा सांगा बरं का गुरुजी'- पोरं ओरडली.

'ठीक आहे. मी तुम्हांला, सुरतेची दुसरी स्वारी आणि दिंडोरीची कथा सांगतो.'

शाहिस्तेखानाच्या स्वारीत झालेले स्वराज्याचे नुकसान, मिर्झाराजे जयसिंग यांनी केलेली प्रदेशाची दुर्दशा, २३ किल्ले द्यावे लागल्यामुळे महसुली उत्पन्नात झालेली घट यांमुळे शिवरायांनी मुघलांना धडा शिकवण्याचा निश्चय केला. मुघलांची आर्थिक राजधानी सुरतला पुन्हा एकदा धडा शिकवण्याचे ठरवले. 'आपण इतिहासापासून हेच शिकतो की आपण इतिहासापासून काहीही शिकत नाही.' हे मुघलांना सिद्ध करायचे होते. यामुळे सुरतेच्या पहिल्या स्वारीतून काहीही धडा न शिकलेल्या मुघलांनी सुरतेच्या संदर्भात एक नवीनच घोळ घातला होता.

'पण सुरतच का'? गणूचा प्रश्न.

अरे, हेरांनी आणलेली बातमी अशी होती- 'सुरतेचा सुभेदार नुकताच मरण पावला असून, तेथील शिबंदी औरंगजेबपुत्र मुअज्जम याने काढून घेतली आहे.' संरक्षणाविना वाऱ्यावर सोडून दिलेल्या सुरत शहराचे रक्षण कोण करणार? आर्थिक राजधानीचे दरवाजे सताड उघडे होते. मराठ्यांना यापेक्षा नामी संधी कोठून मिळणार होती. महाराजांनी कल्याण परिसरात १५ हजारांची फौज गोळा केली.

'महाराजांच्या हालचाली कोणालाच कळल्या नाहीत का?' सदूचा प्रश्न.

'अरे, मुंबईतील गोऱ्या इंग्रजांचे बारीक लक्ष होते. त्यांच्या हेरांचे डोळे सगळ्या देशावर रोखलेले आणि येथील व्यापार गिळण्यासाठी आ वासलेला' अशी इंग्रजांची अवस्था होती. मुंबईकरांनी गुजरातमधील सुरतेच्या सुभेदाराला बातमी कळवली. मिशीवर ताव मारत सुभेदाराने ही बातमी हसण्यावारी नेली. मराठे एवढ्या लांब पुन्हा कशाला येतील अशा कल्पनेत तो गाफील झाला. महाराजांनी सुरतेवर पहिली स्वारी केल्यापासून गेली ६ वर्षे मराठे पुन्हा एकदा सुरतेवर स्वारी करणार, मराठे आले, 'मराठे आले' अशा अफवा वारंवार पसरायच्या.

'पण, मग झालं काय?' सदूचा प्रश्न.

'अरे किती घाई'! - अखेर तो दिवस उजाडला आणि ३ ऑक्टोबर १६७० रोजी महाराज सुरतेत पोहचले. सुरतेत गडबड उडाली. मागच्या स्वारीत सुरत शहराभोवती जी तटबंदी नव्हती. ती या वेळेस होती. सह्याद्रीच्या डोंगरावर ज्यांचे बालपण गेले, त्यांना या तटबंदीची काय भिती!

३ ऑक्टोबर रोजी प्रत्यक्ष स्वारी सुरू झाली. स्वतः महाराज, प्रतापराव गुजर, व्यंकाजी दत्तो आणि आनंदराव मकाजी हे सुरतेच्या रक्षक दलावर तुटून पडले. तलवारी एकमेकींना भिडल्या पण तात्पुरत्याच. मराठ्यांच्या महासागरापुढे मुघल सैन्याचे काहीच चालले नाही. मुघल सैन्य लढण्याऐवजी पळाले. जे पळाले ते एकदम सुरतेच्या किल्ल्यातच आश्रयाला गेले. त्यांनी किल्ल्याचे दरवाजे बंद करून टाकले. मराठ्यांचा

किल्ल्यात शिरण्याचा रस्ता आपण बंद केला याचे समाधान त्यांना लाभले.

फ्रेंच, डच, मुघल यांनी शरणागती पत्करली पण स्ट्रेनशॅम मास्टरच्या नेतृत्वाखाली लढणाऱ्या इंग्रजांनी चिवट प्रतिकार केला. मेल्याशिवाय हाती असलेले स्थळ सोडायचे नाही हा बाणा त्याने जपला. महाराजांना या सगळ्यांशी लढण्याइतपत वेळ नव्हताच. तोफगोळ्यांच्या माऱ्याने शहर अग्नी देवाला प्रसन्न झाले होते. एवढ्यात हेरांनी बातमी आणली की बुऱ्हाणपुराहून मुघल फौज निघाली आहे. अर्ध्या कोटीपेक्षा जास्त रक्कम घेऊन मराठा फौज शहराबाहेर पडली. मुघलांचा दक्षिणेतील प्रतिनिधी मुअज्जमला सुरतेवरील स्वारीची बातमी कळाली. स्वतः जाऊन पराभव स्वीकारण्यापेक्षा त्याने बुऱ्हाणपुरात असणाऱ्या दाऊदखान कुरेशी याला आदेश पाठवला की, 'पिछा करो'.

'पण मग ते स्वराज्यात पोहोचले का'? – शकूने विचारले.

मुख्याध्यापक म्हणाले – 'अगं तेच तर सांगणार आहे ना'.

'सुरतेवरून येताना पेठ – नाशिक – कल्याण – पुणे असा मार्ग ठरला. शत्रूला पाठीवर घ्यायचे, बरोबरचा खजिना स्वराज्यात सुखरूप न्यायचा, मुघल सैन्याला धडा शिकवायचा असे ठरले. साल्हेर – मुल्हेर येथून चांदवड गाठायचे आणि कंचनमंचन घाटाने कोकणात उतरायचे असे महाराजांच्या मनात होते. मराठ्यांना चांदवडच्या डोंगरांची रांग ओलांडू द्यायची नाही अशी प्रतिज्ञा दाऊदखानने केली. वणी–दिंडोरी येथे मुघलांनी मराठ्यांस गाठले. घोडे – बैल यांवर लादलेली अफाट संपत्ती संथपणे पुढे चाललेली होती. तिचे रक्षण करायचे होते, आणि शत्रूला पराभूत करायचे होते. रात्रीच्या प्रहराला दाऊदखानने मराठ्यांना गाठले. आयुष्यात प्रथमच त्याने मराठ्यांना रात्री गाठले होते. त्याला वाटले की, आपण बेसावध मराठ्यांचा सहज पराभव करू. प्रत्यक्षात उलटेच झाले.

महाराजांनी अगोदरच आपल्या सैन्याचे चार भाग केले होते. एक तुकडी खजिना घेऊन पुढे गेली. चारही तुकड्यांमध्ये संपर्क यंत्रणा प्रस्थापित केली. दोन तुकड्या पुढे आणि दोन तुकड्या मागे अशा कात्रीत मुघलांना पकडायचे ठरवले. दाऊदखानचा एक सरदार बाकेखान आणि त्याचा सहकारी एखलासखान यांना जबर उत्साह आला होता. कधी एकदा महाराजांवर हल्ला करून, त्यांना पकडून औरंगजेबाकडे पाठवून बक्षीस मिळवतो, असे या दोघांना झाले होते. 'जोश मे होश खो बैठा' अशा स्थितीत त्यांनी चांदवडपाशी 'बेसावध' मराठ्यांवर हल्ला केला. मराठे चोख सावध होते. बाकेखानाला मराठ्यांनी तलवारीचे पाणी पाजले. पराभूत खान किल्ल्यात पळून गेला. एखलासखान जखमी झाला. प्रथमग्रासे मक्षिकापातः अशी अवस्था झाली. वर्गातल्या मुलांनी जोरदार टाळ्या वाजवल्या.

१७ ऑक्टोबरच्या या लढाईत मुघलांना पहिल्याच फटक्यात मोठा धक्का बसला. गमावलेली अब्रू सावरण्यासाठी मुघलांचे दोन सरदार राय मकरंद आणि भवान पुरोहित पुढे सरसावले. दाऊदखान स्वतः तोफखान्यासह सैन्याच्या मदतीला पोहोचणार एवढ्यात त्याचा स्वतःच्या तोफखान्याची असणारा संपर्क तुटला. तोफखाना एकीकडे आणि खान दुसरीकडे अशी भीषण अवस्था झाली. मराठ्यांच्या दृष्टीने ही सुवर्णसंधी होती. महाराज स्वतःच युद्धाचे नेतृत्व करीत असल्यामुळे मराठ्यांना भलताच उत्साह आला होता. शत्रूला



सहजासहजी सोडायचे नाही असाही विचार होताच.

जवळपास पाच तास युद्ध चालले. तीन हजार मुघल सैन्य मारले गेले. मराठ्यांचेही नुकसान झाले परंतु विजयश्रीने मराठ्यांच्या गळ्यात माळ घातली. कृष्णाजी अनंत सभासद यांनी सभासद बखरीत याचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. ... राजा खासा घोड्यावर बैसून, बख्तर घुगी घालून, हाती पटे चढवून मालमत्ता, घोडी, पाईचे लोक पुढे रवाना करून आपण दहा हजार स्वारांनिशी सडे सडे राऊत उभे राहिले. वणी – दिंडोरी म्हणवून शहर आहे ते जागा उभे राहून सुभ्याचे लोक आले, त्याशी घोरांदर युद्ध केले. ...दोन प्रहर युद्ध जाले. मराठे यांणी शर्थ केली. तीन हजार मोगल मारिले. तीन हजार घोडे पाडाव केले. दोन वजीर मोगलाई सापडले. असे फत्ते करून आले.

एवढ्यात घंटा वाजली आणि टाळ्यांचा कडकडाट होऊन तास संपला.

**संपर्क : ८४५९७७२०१८**

# ठमाकाकू, गुंडाप्पा, चिंपू कोणाला बरे मोठी थैली लाभली?

श्रीनिवास प्रभुदेसाई

**शोधा पाहू ! कोण कुठल्या थैलीचा मालक?**





# मित्र

अर्चना दंडे

आई बघ आकाशी, चांदोबा झोपी गेला
ढगांची केली उशी, अंधाराचे पांघरूण त्याला!

स्वप्नामध्ये त्याच्या मी, येतो जरा फिरून
गरगर घेतो गिरक्या, चांदण्यांचा हात धरून!

कुर्रर करतो कानात, मग येईल त्याला जाग
झोपमोड केली म्हणून, येईल त्याला राग!

धुम्म पळत सुटतो मग, येतो परत घरी
चांदोबा मला पकडायला, येईल आपल्या दारी!

मित्रच माझा येईल घरी, दोघे करू मस्ती
नाही रडणे, नाही हट्ट, मजाच मजा नुसती!

संपर्क : ९८९०१०९४७८

भाग २



# निसर्गायन

मनोज बोरगावकर

लांब दूर युरोपातून मजल दरमजल करत पॅलिड हॅरीअर अर्थात पांढुरका भोवत्या हा पक्षी या महिन्यात नांदेड जिल्ह्यात दाखल झाला आहे. सततचा समुद्रावरून पंधरा वीस दिवसांचा नॉनस्टॉप उडता प्रवास करत हे पक्षी आपल्याकडे दाखल झाले आहेत. सतत पंधरा दिवसांपेक्षा जास्त काळ ते उडत राहतात...किती अविश्वसनीय आहे ना हे! ही मजल मारण्यासाठी ते काय युक्ती करीत असावेत. फार सोपी युक्ती आहे त्यांच्यासाठी. ते सतत उडताना काही काळ त्यांचा डावी कडचा मेंदू बंद ठेवतात तर काही काळ उजवीकडचा मेंदू बंद ठेवून आणि वाऱ्याच्या दिशेचा योग्य वेध घेऊन... आपल्या सोबत्यांबरोबर अशा पद्धतीनं उडतात की कमीतकमी कष्ट घेऊन हा एवढा दांडगा प्रवास त्यांना करता यावा. माझ्या मनात प्रश्न पडतो मग उत्क्रांतीच्या या टप्प्यावर येऊन पोहोचलेला माणूस अधिक प्रगत की... निसर्गाला असे सखोल वाचू शकणारे पक्षी अधिक प्रगत?

याच विचारांचे सूत्र पुढे नेत असेही वाटते की निसर्गाची एक भाषा असते ती समजून घेतली तरच पृथ्वीवरच्या आपल्या अस्तित्वाला काही अर्थ आहे

अन्यथा आपण आपल्याच हाताने पृथ्वीवरचे आपले अस्तित्व खसाखसा पुसून तर नाही ना टाकत आहोत? अगदी बेदरकारपणे...

पर्यावरणाच्या रक्षणासाठी खूप काही शास्त्रीय भाषेत लिहिले जाऊ शकते. पर्यावरण रक्षणासाठी कान कीट्ट होईपर्यंतचा कोलाहल सतत आपल्या भोवती चालूच असतो. पण हा गोंगाट फक्त कानापर्यंत पोहोचून भागणार नाही तर तो आपल्या काळजापर्यंत पोहोचला पाहिजे.

मुंबईची खाजणीची जंगलं तोडून समुद्रकिनारी विमानतळ बांधायचा विचार आपण करतोय. ज्या जंगलांनी समुद्राला रोखून धरलंय... आणि ते रोखून धरणं समुद्रानेही मान्य केलंय त्यात आपण एवढी उलथापालथ का म्हणून करीत बसायची? किती बरोबर म्हटलंय थोरोनं... धन्यवाद परमेश्वरा! माणसं उडू शकत नाहीत म्हणून बरे आहे, नाही तर त्यांनी पृथ्वीसारखंच आकाशालाही नासवून टाकलं असतं!

हा सारा विनाश आजही आपल्याला थांबवता येऊ शकतो. अजूनही उशीर झालेला नाही. किती छान म्हटलंय एका कवीनं –Today I have grown taller from walking with the tree..! अर्थात झाडांसोबत चालताना मला अधिकच उंच झाल्यासारखं वाटतं. किती छान म्हटलंय ज्ञानेश्वरांनी.

**झाडांशी साजणे चाळावे गा।**

**उष्ण पांघुरावे शीत वेढावे ।।**

**वृष्टीच्या असावे घराआतु।**

अर्थात झाडांशी बोलावे लागते, ऊन पांघरावे लागते, पावसाच्या घरात राहावं लागतं तेव्हाच या निसर्गाची ऐपत आपल्याला कळते. तात्पर्य, एक प्रगल्भ परिपक्व प्राणी म्हणून विश्वरचनेच्या या साखळीला अधिकाधिक मजबूत करण्याचा प्रयत्न आपण करीत




राहिलं पाहिजे. नाहीतर निसर्ग नाही तर आपणच आपले अस्तित्व पुसून टाकण्यास जबाबदार ठरू.

आपल्याला हा शेवट थांबवायचा असेल ना... तर निसर्गाची भाषा समजून ती आचरणात आणावी लागेल... डोंगर, जंगल, नदी, समुद्र हे सारे माणसाला द्यायला खूप उत्सुक असतात. प्रश्न असा आहे की आपण त्यांच्याकडून घ्यायचे काय नि ओरबाडायचे काय?

फार पूर्वी नाही पण, वीस पंचवीस वर्षांपूर्वी एखाद्या माणसाचा पत्ता सांगायचा झाला तर घराशेजारी मोठ्ठं वडाचं किंवा पिंपळाचं किंवा कडुलिंबाचं झाड आहे असा पत्ता सांगितला जायचा. पण आता मात्र एखाद्या टोलेजंग इमारतीचा पत्ता सांगितला जातो, ती इमारत असते खूपचं उंच... पण ती सावली मात्र अजिबात देत नाही. जाईजुईच्या वेलीवरून पडणारे फूल कधी तुम्ही काळजीपूर्वक पाहिले का ते कसे गोल गिरक्या घेत खाली पडते जणू काही गुरुत्वाकर्षणाचा कोणताच नियम त्याला लागू नाही. ते फूल सांगत असते 'हलके झालात म्हणजे अलगद खाली पडता आणि अहंम/इगोच्या ओझ्याने जड झालात की धपकन खाली पडता.' निसर्ग किती छोट्या छोट्या गोष्टीतून आपल्याला शिकवत असतो नाही... अट एकच ते शिकायची; समजून घ्यायची तुमची तयारी असली पाहिजे बस्स! निसर्ग आपल्याला त्यांच्यात सामावून घ्यायला तयार असतो..

पण त्यासाठी दोन पावलं पुढे जायची आपलीपण तयारी पाहिजे.

साधे प्राणी पण बघा ना... कुत्रा किंवा गाय कधीही तेलकट पदार्थ खाणार नाही. ॲसिडीटी अपचन झालं की लगेच आपण गोळी घेतो... पण कुत्रं बघा गवत खात आणि पोटाला नको असलेलं उलटून काढतं. किती शहाणे असतात नाही प्राणी... आपल्यापेक्षा तर नक्कीच...!

आता मोरांच्या ऐटदार चालीचे रहस्य समजून घेऊया. एक दिवस भल्या पहाटे मी नदीवर गेलो होतो. नेमका पाऊस पडून गेला होता. मऊशार वाळूत मोर पावलांचे ठसे उमटले होते. मी त्या पावलांचा अंदाज घेत रांगत पाठलाग करायला लागलो. माझी चाहूल लागली की मोर वेगानं पळत होते... पुन्हा सावकाश चालत होते. रांगता रांगता मी शेजारी पडलेली एक काडी उचलली आणि मोरांच्या पावलांमधले अंतर मोजायला लागलो. तेव्हा एक गोष्ट लक्षात आली की, मोर वेगाने चालो की सावकाश चालो तरी त्यांच्या पावलांमधले अंतर मात्र अजिबात बदलत नाही म्हणून त्याची चाल कशी ऐटदार वाटते.

निसर्गाच्या पोटलीत अशा किती तरी कहाण्या असतात, गरज असते ती आपण त्यांच्याकडे डोळसपणे पाहण्याची.

**संपर्क : ९८६०५६४१५४**

**या जंगलात कोणकोणत्या प्राण्यांचे व पक्ष्यांच्या पायांचे ठसे आहेत?**



# विज्ञान गीत

बाबूराव शिरसाठ



विज्ञानाचे गीत गाऊया विज्ञानाचे गीत
तुमच्या आमच्या प्रगतीची इथेच आहे जीत ।। धृ ।।

अंधश्रद्धेला दूर करूया
भोंदूगिरी चला झुगारूया
अज्ञानाला भेदून टाकू हेच आपले हित ।। १ ।।

शोधकर्त्याला करू सलाम
ध्यानी ठेवू सर ए. पी. जे. अब्दुल कलाम
ऋणात राहू आपण त्यांच्या हीच जन रीत ।। २ ।।

शोध नवे अन् नवी धरा
डोळे उघडून बघ जरा
जुने जाऊ द्या, नवे घेऊया, गाऊ आनंद गीत ।। ३ ।।

नव्या ग्रहावर करतो स्वारी
क्षणात करतो दुनियादारी
जात, धर्म विसरून गाऊ मानवतेचे गीत ।। ४ ।।

संपर्क : ९७३०४०८५९०



# कलेचा आनंद

तेलुगू कथा–दासरी वेंकटरमणा
अनुवाद–रेणुका बुधारम



सौशिल्य देशाचा राजा सर्वोत्तम हा कुशलपणे राज्य करीत होता. हा राजा त्या देशातील प्रजेला काहीही कमी पडू न देता चांगल्या प्रकारे परिपालन करणारा राज्यपरिपालक होता. कलेवर त्याची नितांत श्रद्धा होती. 'कलेचा आदर करणारा राजा'अशी त्याची ख्याती होती. राज्यातील प्रत्येक कलाकाराचा योग्य तो सन्मान करून त्यातील प्रतिभावंत कलाकारांना राजा आपल्याच संस्थानात आश्रय द्यायचा. अशा प्रकारे तो कलेची सेवा आनंदाने करायचा.

एकदा राजा सर्वोत्तम व राणी निर्मलादेवी बागेत फिरण्यासाठी गेले. तिथे त्यांना आस्थानातील कविप्रमुख संजीव भेटले. तेव्हा राजा व संजीव या दोघांमध्ये चर्चा अशी झाली की, या राज्यात कला संमेलने भरवावीत व प्रतिभावंत कलाकारांचा यथोचित सत्कार करून त्यांचा मान राखावा. एका मोठ्या उत्सवाचे नियोजन व्हावे. त्या दोघांची चर्चा शांतपणे ऐकून राणी म्हणाली,

'महाराज, क्षमा असावी. परंतु संमेलनाच्या नावाखाली आपण प्रजेच्या पैशांचा दुरुपयोग करत आहेत, अशी माझ्या मनात शंका येते; कारण माणसाला मुख्यत्वे अन्न, वस्त्र, निवारा या मूलभूत सुविधांचीच जास्त गरज भासते. अशा प्रकारच्या सर्व सुविधा लोकांना कशा मिळतील, याकडेच आपण जास्त लक्ष पुरवणे आवश्यक आहे; असे मला मनापासून वाटते. उगाच त्या कलाकारांना बोलावून त्यांच्यासाठी भलामोठा खर्च करणे कितपत योग्य आहे? आपण यावर जरूर योग्य तो विचार करावा. संमेलनासाठी अवाढव्य खर्च न करता तेच धन प्रजाहितासाठी वापरावे, असे मला वाटते.'

महाराणीचे हे वक्तव्य ऐकून कविप्रमुख नाराज झाले. राजालाही खूप अपमानित झाल्यासारखे वाटले. कविप्रमुख संजीव काही एक न बोलता महाराजांची मौनानेच आज्ञा घेऊन तिथून निघून गेले.

राजा सर्वोत्तम मग महाराणीकडे स्मितहास्य करत म्हणाला,

'राणीसाहेब! भगवंताच्या कृपेने आपल्या राज्यातील प्रजेला कुठल्याच गोष्टीची कमतरता नाही. सगळं काही आपल्याकडे भरभरून आहे. मग असे संमेलन करून लोकांना आनंद दिल्यास आपलाही आनंद द्विगुणित होईल ना.'

या उत्तराने राणीचे मात्र समाधान झाले नाही. दोघांमध्ये वाद निर्माण होऊन तो वाढतच गेला. 'प्रत्येक माणसाच्या अंगात एक कलाविष्कार असतो आणि तो कलाविष्कार समाजासाठी अत्यंत उपयोगी पडतो'असे महाराजांचे सांगणे होते. पण 'माणसाला हवा, पाणी, आहार, निवारा यांपेक्षा जास्त कशाचीही गरज नाही.'असं ठाम मत राणी निर्मलादेवीचं होतं.

'खरंच राणी! आपलं म्हणणे अगदी बरोबर आहे. माणसाला जिवंत राहण्यासाठी आहाराची गरज असते, पण नुसत्या आहाराने माणूस कधीच तृप्त होत नाही.'

राजा महाराणीला समजावून सांगत होते. तरीही महाराणी ऐकण्याच्या मन:स्थितीत नव्हत्या. यामुळे दोघांत वाद वाढतच होता. आतापर्यंत घडलेले सर्व संभाषण राजाश्रयातील दरहास नावाच्या सेनापतीच्या कानावर पडले. राजा-राणीचं नक्ष राजाश्रयातील दरहासाकडे गेले. लगेच त्यांनी दरहासला बोलावून 'हा वाद कशासाठी झाला' याची माहिती सांगितली. पुन्हा

त्याच्यासमोर सर्व सत्यपरिस्थिती कथन केली. या वादावर तोडगा काढण्याची जबाबदारी त्याच्यावर सोपवली. राजा-राणीचे विचार शांतपणे ऐकून घेत दरहास काही क्षण विचारात गुंतला आणि दरबारातील एका पहारेकऱ्याला त्याने बोलावून घेतले. त्याला विषय समजावून देत त्याचा अभिप्राय विचारला. पहारेकरी हसून म्हणाला,

'माझ्या माहितीनुसार माणसाला आहारच महत्त्वाचा आहे. आधी पोटोबा... जेवणानंतरच मग सर्वकाही.'

अशा त्याच्या उत्तरावर 'केवळ जेवण केल्यानेच माणूस जिवंत राहू शकतो का? इतकंच सांग.'दरहासने पहारेकऱ्यास धमकावतच विचारले.

'आता काय करावं?' असे म्हणत पहारेकरी डोकं खाजवत म्हणाला,

'का नाही जगू शकणार? अवश्य जगेल.'

दरहास महाराणींना विनंती करत म्हणाला,

'माते, आता हा पहारेकरी काय म्हणाला हे आपण ऐकलंत. त्या पहारेकऱ्याच्या मुखातून सत्य वदवून घेण्यासाठी मला पंधरा दिवसांची मुदत हवी. तेव्हाच कळेल की, माणसाला अन्नाव्यतिरिक्त कोणत्याही गोष्टीची आवश्यकता आहे किंवा नाही.'

दरहास त्या पहारेकऱ्याला आपल्याबरोबर घेऊन गेला व त्याला एका बंदिखान्यात कोंडून ठेवले. दररोज वेळेवर जेवण देण्यात आले. त्या बंदिखान्यात तो एकाकी होता. कुठलाही आवाज येत नव्हता. संगीत, करमणूक साधने, बाहेरची स्वच्छंद हवा हे काही त्याला मिळत नव्हते. ना अनुभवायला मिळत होते. फक्त जेवायचे व झोपायचे या साचेबंद जीवनाला तो अगदी कंटाळला होता. 'हे दु:ख कोणाला सांगावे? येथून बाहेर कसे पडावे?' म्हणून तो अगदी तडफडत होता. त्याची अवस्था फारच वाईट झाली. तो एकाकी बनला. आठ दिवस त्याला आठ वर्षांसारखे वाटले. आठव्या दिवशी मंत्री दरहास त्या पहारेकऱ्याला बंदिखान्यातून सोडण्यासाठी गेले अन् त्याची सुटका केली. पहारेकरी अगदी निराश चेहऱ्याने थकलेल्या अवस्थेत बाहेर आला. लगेच त्याला राजा-राणीसमोर हजर करण्यात आले.

'या आठ दिवसांत तुला त्या बंदिखान्यात कसे वाटले?'

असा प्रश्न दरहासाने पहारेकऱ्याला विचारताच पहारेकरी अगदी रडकुंडीला येता म्हणाला,

'मंत्री महोदयजी, काय सांगू परिस्थिती? कधी एकदा आपले बोलावणे येईल व मी येथून बाहेर पडेन, याच एका आशेवर मी जगत होतो. माझे जगणे असह्य झाले होते. मला या बंदिखान्यात कोंडल्यापासून माझा श्वासच गुदमरल्यासारखा झाला होता. एखादी शिक्षा भोगल्याप्रमाणे मला वाटत होते. रोज पंचपक्वान्नाची मेजवानी असूनदेखील मला ते अन्न विषासारखे वाटत होते. नुसते खाणे, पिणे, झोपणे याव्यतिरिक्त मला काहीच येत नव्हते. ना कुणाची गाठभेट, ना कुणाशी बोलणे. मला तर हे आठ दिवस नरकयातनेपेक्षा भयानक वाटले. कधी-कधी तर असे निरर्थक जीवन जगण्यापेक्षा भिंतीवर डोके आपटून जीव द्यावा, असे वाटत होते. पण माणसाच्या जीवनात अन्न हेच मुख्य नव्हे, जेवणासोबत त्याला इतर छंद, कला, संगीत, नाते या सर्वांची गरज असते, हे सांगण्यासाठी मी आत्महत्या न करण्याचे ठरवले.'

'महाराज, हे आठ दिवस एखादी शिक्षा भोगल्याप्रमाणे मला वाटले, माझे जगणे असह्य झाले. परंतु कुठल्याही क्षणाला आपली हाक माझ्यापर्यंत येईल आणि मी या शिक्षेतून मुक्त होईल, या आशेवरच जिवंत राहिलो. नाहीतर भिंतीवर डोकं आपटून कधीच मेलो असतो.'

घडलेला सारा प्रकार महाराणींना समजावत दरहास म्हणाला,

'पाहिलंत राणी सरकार! आपण सांगितल्याप्रमाणे अन्न, वस्त्र व निवारा या माणसासाठी खूप महत्त्वाच्या गरजा आहेत. परंतु केवळ या गोष्टींमुळे मनुष्य सुखी होऊ शकत नाही. जगण्यासाठी, केवळ जिवंत राहण्यासाठी माणसाला अन्नाची गरज आहे. संतृप्तीचे जीवन जगण्यासाठी माणसाला आचार-विचार, आनंद, उत्साह, चेतना या गोष्टींची नितांत गरज आहे. सृष्टीमधील एका सुंदर फुलाला फुलताना पाहिल्यास तुम्हांला किती आनंद होतो, हे शब्दात सांगता येणार नाही. तो आनंद असतो फक्त तुमच्या डोळ्यांसाठी. एखादे स्वरयुक्त संगीत ऐकताना त्या आनंदलहरी आपल्या कानापर्यंत पोहोचतात. तो मधुर सूर आपल्या कानाला आनंद देतो. असे आनंद देणारे घटक आपल्यामध्ये कितीतरी या सृष्टीत आहेत. त्या आनंदाविना जगणे म्हणजे किती नरकयातना आहेत, याचा आपण अवश्य विचार करावा. माणसाने 'जगण्यासाठी अन्न खावे पण खाण्यासाठी जगू नये' असे आपल्या पूर्वजांनी सांगितले आहे, ते अगदी खरे आहे. फक्त त्याची आठवण आपल्याला करून देत आहे. एवढेच!' हे सर्व ऐकून राजा सर्वोत्तमाने कौतुकाने दरहासकडे पाहात टाळ्या वाजवून त्याचे कौतुक केले व महाराणीकडे पाहिले. महाराणीला आपली चूक उमगली. ती चूक कबूल करत तिने आपली मान खाली घातली.

राजा सर्वोत्तम हसत हसत म्हणाले,

'ते सर्व काही ठीक आहे राणीसाहेब! तुम्हांला हे सर्व समजले पण, आपल्या या वादाला बिच्चारा पहारेकरी बळी ठरला. कारण नसताना त्याला एकांतवासाची शिक्षा भोगावी लागली. त्याचं काय?'

हे ऐकून महारणी निर्मलादेवींनी आपल्या गळ्यातील रत्नहार काढून त्या पहारेकऱ्याला भेट दिला. तेव्हापासून दरवर्षी त्यांच्या गावात संमेलने भरू लागली. 'कलोपासक राजा' म्हणून सर्वोत्तम राजाची कीर्ती दूरवर पसरली.

**संपर्क : ७८८८१५६५३०**

**'किशोर' हे मासिक मालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती यांचेकरिता, मुद्रक व प्रकाशक विवेक उत्तम गोसावी यांनी सोहेल एंटरप्रायजेस, सर्व्हे नं.४८, घर पट्टी नं.४०२, भांडार्ली व्हिलेज, नॅशनल काट्याजवळ, ठाणे-४०० ६१२ येथे छापून 'बालभारती', सेनापती बापट रोड, पुणे-४११ ००४ येथे प्रसिद्ध केले. ✻ संपादक – कृष्णकुमार पाटील.**

**'Kishor' monthly publication is owned by Bureau of Text Book Production and Curriculum Research, Balbharati, Printed and Published by Vivek Uttam Gosavi, Printed at M/s. Sohail Enterprises, S.No. 48, Ghar Patti No. 402, Bhandarli Village, Near National Kata, Thane-400 612 and Published at Balbharati, Senapati Bapat Road, Pune-411 004. ✻ Editor - Krishnakumar Patil.**

अमित डहाणे

# कुतूहल

'किशोर' मित्रांनो,
'किशोर' जानेवारी २०२३ च्या अंकातील कुतूहलची किती उत्तरे तुम्ही बरोबर दिलीत? या अंकात दिलेल्या उत्तरांशी आपण दिलेली उत्तरे ताडून पाहा. तुमच्यासाठी आणखी काही प्रश्न दिले आहेत. स्पर्धकांनी प्रश्नांची उत्तरे कोणाचीही मदत न घेता स्वतंत्रपणे लिहून पाठवण्याचे पथ्य काटेकोरपणे पाळावे. अचूक उत्तरे 'किशोर'कडे २५ फेब्रुवारी २०२३ पूर्वी अनुक्रमणिकेतील पत्रव्यवहाराच्या पत्त्यावर पाठवावीत किंवा ई-मेल करावा.

संपर्क : ९४२१०५०३८८

**१) कोणत्या देशाने अलीकडेच महिलांची स्वाक्षरी असलेली पहिली नोट बाजारात आणली?**

१) चीन २) जर्मनी

३) अमेरिका ४) जपान

**२) कोणत्या राज्यात १३ वर्षाखालील मुलांच्या थिएटर फेस्टिव्हलची सुरुवात होणार आहे?**

१) महाराष्ट्र २) आसाम

३) गुजरात ४) पश्चिम बंगाल

**३) कोणत्या राज्यात शिशुपाल टेकडी हा परिसर 'पर्यटन स्थळ प्रकल्प' म्हणून विकसित केला जाईल?**

१) हिमाचल प्रदेश २) मध्य प्रदेश

३) छत्तीसगड ४) कर्नाटक

**४) आजपर्यंत सर्वात अधिक वेळा FIFA फुटबॉल विश्वचषक कोणत्या देशाने जिंकला आहे?**

१) अर्जेंटिना २) फ्रान्स

३) ब्राझील ४) पोर्तुगाल

**५) भारतीय पंचागानुसार खालीलपैकी कोणत्या महिन्याच्या दिवसांची संख्या ३१ एवढी आहे?**

१) माघ २) मार्गशीर्ष

३) अश्विन ४) श्रावण

**६) ऑक्सिजनचा शोध कितव्या शतकात लागला?**

१) १६ व्या २) १७ व्या

३) १८ व्या ४) २० व्या

**७) भारतीय ऑलिम्पिक संघटनेच्या अध्यक्षपदी कोणाची नियुक्ती करण्यात आली आहे?**

१) पी.टी. उषा २) नीता अंबानी

३) कल्याण चौबे ४) हर्षवर्धन राठोड

**८) मंदौस या चक्रीवादळाचा कोणत्या राज्याला तडाखा बसला होता?**

१) महाराष्ट्र २) गुजरात

३) आंध्र प्रदेश ४) केरळ

**९) नुकतेच निधन झालेल्या 'सुलोचना चव्हाण' या कोणत्या क्षेत्राशी संबंधित होत्या?**

१) चित्रकला २) गायन

३) इतिहास ४) नाट्य

**१०) भारताच्या कोणत्या क्रिकेट खेळाडूने सर्वात वेगवान द्विशतक केले?**

१) रोहित शर्मा २) सचिन तेंडुलकर

३) विरेंद्र सेहवाग ४) इशान किशन

**११) राष्ट्रीय मागासवर्ग आयोगाच्या अध्यक्षपदाची सूत्रे कोणी स्वीकारली आहेत?**

१) हंसराज अहिर २) हरि नरके

३) सदानंद मोरे ४) छगन भुजबळ

**१२) नौटंकी हा कोणत्या राज्याचा नृत्य प्रकार आहे?**

१) उत्तर प्रदेश २) पंजाब

३) दिल्ली ४) बिहार

१३) **'सिटी ऑफ जॉय' या पुस्तकाचे लेखक कोण आहेत?**

१) चेतन भगत २) अरुंधती रॉय

३) डॉमिनिक लॉपिए ४) रॉबिन शर्मा

१४) **सध्या महाराष्ट्राचे विधान परिषद उपसभापती कोण आहेत?**

१) राहुल नार्वेकर २) नरहरी झिरवाळ

३) रामराजे निंबाळकर ४) नीलम गोऱ्हे

१५) **जी– २० गटाची स्थापना कोणत्या वर्षी करण्यात आली?**

१) १९९९ २) २०२१

३) २००५ ४) २०१४

---

## जानेवारी २०२३ च्या चित्रकोड्याचे उत्तर




## कुतूहल डिसेंबर २०२२ यशस्वी स्पर्धक

**सातारा**–कु. सुवीर फडे

## कुतूहल जानेवारी २०२३ ची उत्तरे

| | | |
|---|---|---|
| १) ३ | २) १ | ३) २ |
| ४) १ | ५) ३ | ६) ३ |
| ७) २ | ८) १ | ९) ३ |
| १०) ३ | ११) २ | १२) २ |
| १३) १ | १४) ३ | १५) ४ |

## चित्रकोडे डिसेंबर २०२२ – यशस्वी स्पर्धक

| | |
|---|---|
| **सातारा –** | कु. सुवीर फडे |
| **परभणी –** | कु. अर्नव मंत्री |
| **अकोला–** | कु.सायली गावंडे, कु. सृष्टी वानरे, कु.खुशी उभे, कु. धिरज डांगटे. |
| **अहमदनगर–** | कु.प्रेम काळे, कु.विराज भालेकर, कु.गायत्री हासे, कु. समिक्षा हासे, कु. मयुरी जाधव, कु. स्वरांजली घुले, कु.श्रद्धा शिंदे, कु. साईश हासे, कु.अपेक्षा कदम, कु.तेजस हासे, कु.कार्तिकी गोडे, कु.स्वरांली खतोडे, कु.श्रेया उदमले, कु.गणेश गोपाळे, कु.राज जाधव, कु.समीर सोनवणे, कु.वेद घोलप, कु.प्रणाली शेरे, कु. हर्षल देशमुख. |
| **चंद्रपूर –** | कु. संकल्प पाझारे |
| **बुलढाणा –** | कु. सार्थक कोथळकार, कु. वैष्णवी तायडे |
| **नाशिक –** | कु. श्रावणी भवर, कु. प्राची भवर, कु.यश जाधव, कु.कार्तिक चव्हाण |
| **जुन्नर–** | कु.कार्तिक उत्तर्डे, कु.सागर जाधव, कु.श्रेयश उत्तर्डे, कु. दिव्या उत्तर्डे. |
| **सिंधुदुर्ग–** | कु.आर्या गावडे, कु.वेदिका सावंत, कु.दीक्षा गावडे, कु.मनस्वी कांबळे, कु.विनय कांबळे, कु.आयुष नाईक, कु.मोनिका पालव, कु.निखिल गावडे, कु.दीपक गावडे. |
| **कोल्हापूर –** | कु.कन्याकुमारी नाईक, कु.तेजस्विनी शिरढोणे, कु. स्नेहल शिरढोणे, कु. सूर्यकांत शिरढोणे, कु. अर्जुन मंदरे. |
| **धुळे –** | कु. जयदीप पाटिल |
| **औरंगाबाद –** | कु. साक्षी पाईकराव |
| **रत्नागिरी –** | कु. सुमुख कोनकर |

माणूस जेव्हा एखादी चांगली गोष्ट करतो, तेव्हा आपण त्याला चांगला म्हणतो. अशा चांगल्या गोष्टी तुम्हीही नक्कीच केल्या असतील.

* तुम्ही दुसऱ्यांबद्दल आपुलकी आणि सहानुभूती दाखवता का?
* जे तुमच्यापेक्षा लहान आणि दुर्बल आहेत त्यांचे रक्षण करता का?
* ज्यांना मदतीची गरज आहे त्यांना मदतीचा हात देऊ करणे म्हणजे चांगुलपणा, असे तुम्हालाही वाटते ना?

# भावी आधारस्तंभ

**मग लागा पाहू लिहायला. त्यासाठी सदर आहे – 'भावी आधारस्तंभ', तुम्हाला मानधन व वर्षभर अंक मिळेल. तुम्ही केलेल्या सत्कृत्याचा १० ते १५ ओळी मजकूर सुवाच्य अक्षरांत लिहा. तुमचे संपूर्ण नाव, पत्ता (पिनकोड नंबरसह), शाळेचे नाव, वय, इयत्ता इत्यादी तपशील द्या. पासपोर्ट आकाराचा फोटोही लावा. पाकिटावर रु.५/–चे तिकीट लावून अनुक्रमणिकेतील पत्रव्यवहाराच्या पत्त्यावर पाठवा.**



सुट्टीला मी माझ्या मामाच्या गावी गेलो होतो. तिथे मी बाहेर मुलांबरोबर खेळत असताना पाहिले की,छोटे मांजरीचे पिल्लू कोणीतरी रस्त्यावर सोडून दिले होते. त्याचा रंग करडा होता. मांजरीचे पिल्लू अतिशय मोहक दिसत होते. काही मुले त्या मांजरीच्या पिल्लाला दगड मारत होती. ते मांजरीचे पिल्लू सैरावैरा इकडून तिकडे धावत होते. बिचारे पिल्लू! मला त्या पिल्लाचे खूप वाईट वाटले. ते सतत म्याव म्याव करत होते. एक तर ते पिल्लू भुकेने कासावीस झाले होते. मी ते मांजरीचे छोटेसे पिल्लू घरात आणले आणि त्याला एका वाटीत दूध प्यायला दिले. भुकेने व्याकूळ झाल्यामुळे त्या पिलाने पटकन दूध प्यायले. नंतर ते माझ्या मांडीवर घेऊन बसले. त्याच्या छोट्या–छोट्या डोळ्यातून भावना स्पष्ट जाणवत होती.प्राणी जरी बोलत नसले तरी त्यांच्या डोळ्यातून भावना स्पष्ट दिसतात विशेष म्हणजे ते पिल्लू नंतर माझ्याबरोबर खूप खेळायला लागले. मी जिथे जाईन तिथे माझ्या पाठीमागे यायचे. मी ठरवले आपण त्याला घरात ठेवायचे. अशा प्रकारे ते आमच्या घरातील एक सदस्य झाले. आम्हा सर्वांना त्याचा लळा लागला आणि त्याला आम्ही प्रेमाने सिंबा म्हणतो. आम्ही सर्व सिंबावर खूप प्रेम करतो. सिंबाची आणि माझी पक्की मैत्री झाली आहे.ते सतत माझ्या अवतीभवती फिरत असते.मला त्याचा खूप लळा लागला आहे..

**रुद्रांश सुरेश जगताप,**
इयत्ता ३ री, आप्पासाहेब भाऊराव पाटील इंग्लिश
मीडियम स्कूल, सातारा–४१५००२



उन्हाळ्याची सुट्टी होती. मी माझ्या मामाच्या गावाला गेलो होतो. मी एकदा खेळताना माझी नजर पेरूच्या झाडावर पडली. त्या झाडावर एक पोपट होता. तो पेरू खात होता. तेवढ्यात एका घारीने पोपटावर झडप घातली. मी घारीला उडवून लावले. आणि मी बघतो तर काय? पोपट खाली पडला होता. मी त्याच्या जवळ गेलो. पोपट घाबरलेला होता. मी त्याला अलगद हातात घेतले आणि त्याला घरात घेऊन गेलो. पोपटाच्या पायाला जखम झाली होती. मी त्याच्या पायाला औषध लावले. त्याच्या चोचीजवळ पेरू आणि पाणी ठेवले. त्याने पेरू खाल्ला आणि पाणी प्यायले. त्यानंतर मी त्याला सोडले. तो उडून गेला. सगळ्यांनी माझे कौतुक केले.

**अतिष अयुष सागवेकर,**
इ.४ थी, जि.प.प्रा.शाळा दळे नं. २,
मु.रूमीपीरवाडी, पो.दळे, ता. राजापूर,
जि.रत्नागिरी ४१६७०२



माझी आजी दररोज सकाळी लवकर उठून स्वयंपाक करते व सर्वांचा चहापाणी करते. एकदा माझ्या आजीची तब्येत बरोबर नव्हती. ती सकाळी उठलीही नाही व तिने मलाही उठवले नाही. जेव्हा माझे डोळे उघडले तेव्हा मी मला जे कामे येतात ती कामे आटोपली. मग मी मेडीकलमधून आजीसाठी गोळ्या आणल्या व आजीला गोळ्या दिल्या मग मी शाळेत गेले. जेव्हा माझे आई-बाबा पुण्याहून घरी आले तेव्हा माझ्या आजीने त्यांना सांगितले की खुशीने सर्व कामे आटोपली व मला गोळ्या दिल्या. हे ऐकून मला आनंद झाला.

**कु. खुशी देवराव उभे,**
इयत्ता ६ वी,
जि.प.व. प्राथमिक शाळा
खंडाळा, मु.पो.खंडाळा,
ता. तेल्हारा, जि.अकोला.



मी एके दिवशी पाणी आणायला गेले होते. माझ्यासोबत एक म्हातारी आजीसुद्‌धा पाणी आणायला आली होती. मी माझे पाणी घेऊन घरी आले आणि पुन्हा परत गेल्यावर मला असे दिसले की पाण्याचे कॅन आजीला उचलत नव्हते. त्यामुळे मी आजीला मदत केली. पाण्याचे दोन्ही कॅन मी आजीच्या घरी नेऊन दिले. त्या आजीला खूप आनंद झाला. मला जवळ घेऊन मला म्हणाली, ''धन्यवाद बाळा''. आजीचा आनंद पाहून मलासुद्‌धा खूप आनंद झाला.

**कु. ज्ञानेश्वरी बाळू चित्ते**
इ.७ वी,
जि.प.पूर्व मा. शाळा
जैनपूर, ता.दर्यापूर,
जि.अमरावती ४४४७०६



एकदा एक काका आमच्या घरासमोरून आम्हांला हाक मारत होते. मी बाहेर गेले तर ते म्हणाले, बेटा, तुझ्या घरी माझ्यासाठी काही खायला आहे का? मी पळतच घरात गेले, आई पोळी करत होती. आईकडून दोन पोळ्या घेऊन, बटाट्याची भाजी घेऊन मी काकांकडे गेले आणि त्यांना खायला दिलं. त्यांना खूप आनंद झाला. ते जातच होते की मी त्यांना थांबवून एक नवा शर्ट दिला, त्यांना खूप आनंद झाला. मी हे सगळं पप्पांना सांगितलं. त्यांनी माझी पाठ थोपटली. काकांचे पोट भरल्यावर त्यांनी मला आशीर्वाद दिला. दिवाळी सणाच्या वेळेस एका व्यक्तीला आनंदी करून मलाही खूप आनंद झाला.

**कु. तनिष्का योगेश वडनेरे**
इ.१ ली, सिस्टेल इंग्लीश
मिडीयम स्कूल,
३१/१, प्रोफेसर कॉलनी
(धुळे), देवपूर,
धुळे ४२४००२

# उमलती प्रतिभा

## फूल आणि मूल

मूल हसते फूल उमलते
चांदण्यासारखे ते चमकते,
पाणी दिले की फूल हसते
मग त्याला पाहून मूल हसते.
फुलपाखरांना आवडतात
फुलं आणि मुलं
आणि मुलांना आवडतात
फुलपाखरं आणि फुलं.
फुलांच्या पाकळ्या रंगीबेरंगी
फुलांचा छान छान सुगंध
अशा झाडाला पाहून
आम्हांला वाटतो खूप आनंद.
फुलांना आवडते मूल,
मुलांना आवडते फूल.

निदा हुमेरा मुनवर शेख
वर्ग–दुसरा, जि.प.प्रा.शाळा, रायपूर
ता.सेलू जि.परभणी–४३१५०३

## झाड

मी लावलं एक झाड
झाडाला म्हटलं लवकर वाढ
झाडाला घातले रोज पाणी
झाडासाठी गायली गाणी
झाड लागले वाढायला
मुलं लागली खेळायला
झाडाला आली पान फुलं
फुलं वेचायला आली मुलं
पाखरं लागली झाडावर बसू
झाडाला आले खुदकन हसू

अनुष्का मुनेश्वर रामेश्वर
वर्ग सातवा,
जिल्हा परिषद प्रशाला एरंडेश्वर
ता. पूर्णा जि. परभणी

## रक्षाबंधन

एका जंगलामध्ये दोन बहीण–भाऊ राहत होते. त्यांची नावे माकड आणि मांजर. ती दोघे खूप चांगली होती. मांजर मैत्रिणीसोबत शाळेत निघाली. शाळा सुटल्यानंतर तिच्या मैत्रिणी राखी आणण्यासाठी जात होत्या. पण मांजर जात नव्हती, कारण तिच्याकडे पैसे नव्हते. मग तिने मैत्रिणीकडे पैसे मागितले, पण मैत्रिणींनी राखीपुरते पैसे आणले होते. ती मैत्रिणीसोबत दुकानात गेली. राख्या बघितल्या घरी जाऊन तिने विचार केला. तिला युक्ती सुचली. तिने साहित्य गोळा करून राखी बनवली व जेवून अभ्यास करून झोपली. सकाळी उठून दात घासून अंघोळ करून कपडे घालून ताट तयार करून आईला म्हणाली, आई मी दादाला राखी बांधून येते. मांजर राखी बांधण्यासाठी भावाच्या घरी गेली. भावाने तिचे स्वागत केले. पाणी प्यायला दिले. मांजरीने माकडाला राखी बांधली. ओवाळले, बर्फी खायला दिल. भावाने भेट म्हणून पुस्तक दिले.

पूजा दत्ताराम सूर्यवंशी
जि.प.प्राथमिक शाळा, मस्करवाडी, पो.चव्हाणवाडी, ता.कराड,
जि. सातारा, पिन–४१५५२०.

# सामर्थ्य मराठीचे

मराठी माणसाच्या मनगटातील ताकद मराठी
शिवरायांच्या पराक्रमाची साक्ष देते ती मराठी
पराक्रमी इतिहासाचे जतन मराठी
आमुची भाषा आमुचा अभिमान मराठी

तलवारीच्या पातीवरची धार मराठी
मराठमोळ्या छातीवर झेललेला वार मराठी
आई भवानीचं वरदान मराठी
आमुची भाषा आमुचा अभिमान मराठी

संतांच्या मुखातून निघालेली पवित्र वाणी मराठी
नव्या युगातील प्राचीन कहाणी मराठी
महाराष्ट्राची शान मराठी
आमुची भाषा आमुचा अभिमान मराठी

सह्याद्रीच्या कुशीतला वारसा मराठी
शुद्ध व सुंदर भाषेचा आरसा मराठी
मातीशी जुळलेली नाळ मराठी
आमुची भाषा आमुचा अभिमान मराठी

पावसाच्या रेघांतील साद मराठी
कुसुमाग्रजांच्या कवितेतील नाद मराठी
बहिणीबाईंच्या ओव्यांतील भाव मराठी
आमुची भाषा आमुचा अभिमान मराठी

**ईश्वरी सरोजा साईनाथ लखमोड**
न्यु इंग्लिश स्कून, विन्हेरे
ता.महाड, जि.रायगड



**कु.दीक्षा उत्तमराव आरखराव**
इ.४ थी, रा. राजंदा, ता.बार्शिटाकळी, जि.अकोला



**फरहत निसार अहमद इनामदार**
इ.आठवी, सांगोला विद्यामंदिर प्रशाला व ज्यु.कॉलेज
ता. सांगोला, जि. सोलापूर




**कु. स्वानंदी सागर पठार**
इ.१ ली, विवेकानंद बालसंस्कार, चोपडा, जि.जळगाव


पाठलाग
घनश्याम देशमुख
संपर्क ९८२३४१३६२९
शूऽऽ हळू बोल गण्या कुणीतरी ओढ्याच्या बाजूने चालत जातंय...
पाणी प्यायला बिबट्या आला असेल...
अस्वलही असू शकतं. चल त्या झाडामागून लपून बघू या.
कुणीतरी माणूस आहे, तहान लागली म्हणून ओढ्याकडे चाललाय.
चल, त्याला तुझ्या कपिला गाईबद्दल विचारूया
थांबा! त्याच्या हातात बघ आणि त्याचा चेहरा बघ
हातात मोठ्ठा कोयता आहे, मग त्यात काय...?



त्याच्या शेळीसाठी चारा न्यायला आला असेल जंगलात, कोयता घेऊन.
तुला तो शेळी पाळणारा शेतकरी वाटतो का? त्याचे कपडे बघ तो शहरी वाटतोय...
तो ओढ्याजवळ गेला आणि बाटलीत पाणी भरू लागला.
त्याचा मोबाईल वाजतोय, कोण असेल हा?
अरे मी आलोच, जास्त धडपड करत असेल तर त्या गाईच्या गळ्यातल्या दोराने बांध त्याला...
कोणाचा फोन आला रे त्याला? इतका वैतागला का तो!
गाईच्या गळ्यातला दोर म्हणजे माझी गाय त्याच्याकडे आहे तर...
गण्या चल! याचा पाठलाग करूया म्हणजे कपिला सापडेल
क्रमशः

# अंकांची गंमत

सौ.सुहासिनी सुरेश




पहा एकाची आहे कशी वेगळीच ढेक
नाही झाला पाठ तर छडीचा देतो शेक
दोनचा तर उजळणीत नंबर दुसरा
आहे त्याचा फार तोराच फुगरा
तीनचे आलेत दोन्ही गाल वर
त्यांनी तर टाकली आहे उजळणीत भर
चारला फुटलीत पहा शिंगेच दोन
आपण सारे खाऊ आईस्क्रीमचा कोन
उभा आहे बघा ध्यानस्थ पाच
धरूया फेर करूया नाच
रुसून फिरले तीन की झाले सहा
तुम्ही मात्र सारे फळ्याकडे पहा
सात तर वाकलेत कंबरेत फार
झालाय त्यांना सहा जणांचा भार
आठचा तर पहा दिमाख किती
आहे का त्यांना कुणाची भिती
झोपलाय कसा पहा शांत नऊ
ममतेने आजी देते पोळी मऊ मऊ
धरून आलेत घट्ट एकचा हात
शून्याची करामत करते घात
ओळखले का तुम्ही यांना पहा
एकावर शून्य हे आहेत दहा
दहा तर करतो साऱ्यांवर मात
आवडली का तुम्हांला अंकांची बात









संपर्क : ९३०९८५४४९३



# इंग्रजी विभाग

Ans 4




## FIND MY NAME

Mahadev B. Burute

Ans 3




I'm small bird, my color is gray
With dark gray stripes on my wing
I'm a friend of small babies
In their story or the song they sing..!

I'm the cleaner of Mother Nature
I have Gray black wings, I live on the tree
I catch the bread thrown by you
In your locality I stay costfree..!

Ans 1




My color is green
And my beak is red
I love fresh guavas
And Chilies red red..!

Ans 2




I'm your pet bird
The Clock of old Grandmother
I Crow early every morning
To awaken the whole world..!

Contact : 9765374805

Yash Gohad

# The Sparrows' Water Party

There was a boy named Ishan. He would go to his terrace and pour some water in a bowl. One sparrow came and started drinking the water. Soon many sparrows came and drank the water. The boy enjoyed watching them!

One day the sparrows decided to have a water party with the water the boy gave them. But when they arrived there, they realised that the boy wasn't there! They waited patiently, thinking that he might take some time. So they went to another house. There was a new born baby and his washed clothes were hanging in the balcony. They were of the size of the sparrows. So the sparrows took his clothes and wore them. They got themselves ready for the Water Party. They waited till the nightfall. Ishan did not come!

"Something is wrong," said one of the sparrows. They went inside his house. They were surprised to see no one there! Not even his parents! They looked for the family everywhere. When they went to the lawn area, they found a note left upon it. They realised that something was written on it. It read 'Give us 50 diamonds and we will let you free...'

The sparrows realised that Ishan and his parents were kidnapped! They decided to search the entire city. But they found nothing. There was only one man they



met; who was friendly to them. His name was James who lived in a nearby village. While the sparrows searched the village, James went around asking the village people if they they knew about any kidnappers lately. One villager, whose name was James, said that he knew some people who were new to their village and looked shady.

He told them about their hideout. James and the sparrows went to the place and when they tried to open the door, they heard a mechanical voice say, 'Password Please!' They didn't know the password. But just then, James saw some symbols on the ground.

James decoded the password. “See, there is 1 Sun, 2 clouds, 5 pencils, 4 triangles and 3 candles. So the password is 1,2,5,9,3.” But when he typed the password. Oh No. It was wrong! He further looked at the objects. They were five.So he took another five and added them all. 1+2+5+9+3+5= 25. So the password is 25. When he typed it, he was right!

The door opened. All the kidnappers were waiting for them. But they weren't afraid because James was a black belt holder in Karate.The sparrows could fly. They pecked the kidnappers on their head. So James used his kicks and defended himself, while on the other hand, the sparrows pulled at the hair of the kidnappers.

James and the sparrows had won the battle. Suddenly a hole opened underneath and they fell to a basement and there was Ishan and his parents who were gagged and tied up!

In front of them stood the head kidnapper, holding a knife to kill James and the sparrows. He also had the jail keys, but it was necessary to defeat the Head Kidnapper. But before James could attack, the Head took his knife and stabbed James in his chest. James was about to die. Just in good time, the sparrows saw a healing potion which they took and poured it on James. James struggled to stand up and realised that he couldn't fight! The sparrows quickly grabbed a sword which they saw in the corner of the room. They picked it up together and gave it to James who instantly killed the Head. They freed Ishan and his parents. Ishan thanked the sparrows and James. His parents did so too. Then they went back home and the sparrows had a wonderful 'Water Party'.

**Contact : 9881432775**

# Funny Puzzle

Ghanshyam Deshmukh




1 2 3 4 5 6 7

Choose a number from the number box to complete each subtraction fact in the puzzle. Use each number only once.



Match the picture with its shadow.



# चित्रकोडे

रचना - घनश्याम देशमुख

हे चित्राचे शब्दकोडे आहे. यात चित्रांची नावे लपलेली आहेत. प्रत्येक चित्र बघून खालील चित्रकोडे पूर्ण करा.




## सूचना

१) स्पर्धकांनी आपले नाव केवळ पाकिटावर न लिहिता कोडे सोडवले असेल त्या कागदावर लिहिणे आवश्यक आहे.

२) कोड्याचे उत्तर पाठवण्याची अंतिम तारीख २५ फेब्रुवारी २०२३.

३) कोड्याचे उत्तर मार्च २०२३ च्या अंकात प्रसिद्ध होईल.

४) कोडे वेगळ्या कागदावर सोडवले तरी चालेल.

Registered R.N.I.NO. 22679/72

Kishor (Marathi) Postal Regd.No. PCW/076/2021-2023 Registered Newspapers posted at PUNE PSO, GPO- 411 001
The date of publication 26.01.2023 Posting on 27th & 28th January 2023
License to Post without prepayment of postage No. WPP-53



**If not delivered please return to :**
संपादक, ‘किशोर’ मासिक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व
अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
‘बालभारती’, सेनापती बापट मार्ग,
पुणे – ४११ ००४.
दूरध्वनी : ०२० – २५७१६२४४
ई–मेल : executive_editor_kishor@ebalbharati.in
वेबसाईट : www.kishor.ebalbharati.in

प्रति,